प्रथमावृत्ति, मार्च १९५०

मुद्रक : गणेश सदाशीव बेंदूर, नवी दुनिया मुद्रणालय, माधवदास पास्ता रोड, मुंबई १४.

प्रकाशक : वामन विष्णु भट, अभिनव प्रकाशन, २२।३ अहमद सेलर बिल्डिंग, नायगांव, मुंबई १४.

तारीख १८ मार्च, एकोणीसशें पन्नास रोजीं परळवरील दामोदर ठाकरसी हॉलमध्यें सर्वोदय कला मंदिराच्या नाट्य शाखेनें या नाटकाचा पहिल प्रयोग केला. त्या कामीं खालील कलावतांनीं नाटकांत भाग घेतला होता.

| | |
|---|---|
| **पांडोबा विचारे** | चिंतामणराव कोल्हटकर |
| **मकाजा फ्रूटवाला** | सुकुमार नागोटकर |
| **गोविंद साळवी** | दत्ताराम वळवईकर |
| **गंगूताई** | सुशीला शेजवाडकर |
| **गृहस्थ** | दीनानाथ टाकळकर |
| **गणू गडी** | घाणेकर |
| **गौरी** | मंगला पितळे |
| **साथिदार** | उद्धव रंगारी |
| **डॉक्टर रमेश विचारे** | अंता वर्तक |
| **कुंदा** | सुशीला भावे ( गोडसे ) |
| **बापू मांग** | श्रीनिवास जोशी |
| **मैना** | जयश्री शेजवाडकर |



| | |
|---|---|
| **दिग्दर्शक** | चिंतामणराव कोल्हटकर |
| **संगीत दिग्दर्शक** | सुंदराबाई जाधव |
| **नृत्य दिग्दर्शक** | प्रोफेसर पार्वती कुमार |
| **निर्माता** | मामा वरेरकर |
| **सहाय्यक** | मधुसूदन बस्तीकर |
| **स्टेज मॅनेजर** | शंकर बुधे |



[ प्रस्तुत नाटकांतील पात्रें, त्यांचीं नावें, प्रसंग हे सर्व काल्पनिक आहेत. कोणत्याही विद्यमान किंवा मृत व्यक्तीशीं त्यांचा कसलाच संबध नाहीं. ]

# प्र स्ता व ना

समाजधारणा, समाजसुधारणा आणि समाजशिक्षणाच्या कामीं ज्यांचें अस्तित्व प्रामुख्यानें जाणवतें अशा कांहीं व्यक्तींच्या परिस्थितीवर आधारलेलीं नाटकें लिहिण्याची माझी योजना होती. त्याला अनुसरून चित्रकाराच्या परिस्थितीवरचें ' माझ्या कलेसाठीं,' ग्रंथकाराबद्दलचें ' सारस्वत ' अशीं दोन नाटकें यापूर्वींच प्रसिद्ध होऊन रंगभूमीवर आलीं आहेत. त्याच मालिकेंतील नृत्यकाराच्या भूमिकेवर आधारलेलें प्रस्तुत तिमरें नाटक आहे. संपादक, शिक्षक, डॉक्टर आणि कारकून यांच्या चरित्रावरचीं नाटकें यापुढें लिहिण्याचा मानस आहे.

माझें ' जिवाशिवाची भेट ' हें नाटक बहुप्रवेशी होतें. तें लिहिलें गेलें त्यावेळीं फिरता किंवा सरकता रंगमंच अस्तित्त्वांत आणण्याची अपेक्षा होती, पण ती सिद्ध न झाल्यामुळें तें नाटक रंगभूमीवर आणतांना आजच्या थिएटरच्या परिस्थितीमुळें प्रयोगाच्या कामीं मोठे अडथळे झाले. ज्या प्रकारची प्रकाशयोजना त्या नाटकासाठीं केली गेली तशी योजना त्या नाटकासाठीं योग्य स्वरूपांत व्हायला आजच्या नाटकगृहाची परिस्थिति आड आली: त्यामुळें हें नाटक एकांकप्रवेशीच लिहिलें गेलें आहे. आधुनिक नाटकलेखनाच्या तंत्राच्या दृष्टीनें नाटक एकांकप्रवेशीच पाहिजे असा जो समज निर्माण झाला आहे तो चुकीचा आहे. आधुनिक नाटकाच्या रचनेच्या मर्यादा प्रवेशाच्या नियंत्रणावर अवलंबून नाहींत. ती जी आधुनिकता असावी लागते ती नाटकाच्या गाभ्यांत-- बाह्यस्वरूपांत नव्हे. आधुनिक नाटकांत एकांकप्रवेशाप्रमाणेंच बहुप्रवेशी नाटकांचाही समावेश होत असतो.

प्रस्तुत नाटकाचा विषय सामान्य जनजमाजाच्या दृष्टीनें थोडासा अपरिचित आहे. नर्तकाच्या चरित्राप्रमाणेंच त्या कलावंताची मनोभूमिकाही सामान्यांना परिचित नाहीं. नर्तकाप्रमाणेंच महाराष्ट्राची मराठमोळ कला म्हणून प्रसिद्ध असलेला तमाशाही सर्वतोमुखी असला, तरी शिष्ट समाजाला तो कितीसा परिचित आहे याची शंका आहे. नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या ' तमाशा सुधारणा समितीच्या ' अहवालावरून सामान्य प्रेक्षकाला त्याची थोडीबहुत कल्पना आली असेल.

एव्हढेंच. प्रस्तुत नाटकांत मांडलेली महाराष्ट्रीय तमाशामागची आध्यात्मिक आणि आधिभौतिक भूमिका सामान्य प्रेक्षकाला जर हृदयगम्य झाली तर या नाटकानें पुष्कळच कार्य केलें असें मला वाटेल.

स्वराज्य आलें, त्याचें लोकसत्ताक राज्य झालें. इंग्रज गेले खरे पण भारतांत त्यांचें प्रस्थ माजवायला कारणीभूत झालेली इंग्रजी भाषा अजूनही गेलेली नाहीं--आणखी पंधरा वर्षे जात नाहीं. इंग्रजी भाषेचें ऋण नाकबूल करण्याइतके आपण कृतघ्न नाहीं, हें खरें असलें तरी हें ऋणाचें ओझें किती दिवस माथीं वहायचें ? चक्रवाढ व्याजापेक्षांही जास्त भरमसाट व्याज देऊन मुद्दलासकट फेड केली तरीही या ऋणाचा बोजा माथीं वाहाण्याची गुलामी वृत्ती अजून आपल्यामधून जात नाहीं. पांढरपेशा वृत्तीला बहुजन समाजांत जो अकारण मान आज मिळत गेला आहे तो या इंग्रजी भाषेतील पदवीच्या प्रपंचामुळेंच. भारतांत असणाऱ्या असंख्य जातींच्या प्रपंचाला या पदवीमुळें एक नवीन जातीची जोड मिळाली आहे. आणि एके काळीं मागासलेपणाचा अभिमान मिरवणारा पण वर्णभेदाप्रमाणें खालच्या जातीचा समजला गेलेला माणूस पदवीच्या प्रपंचानें आलेला युनिव्हर्सिटीचा ब्राह्मण-पणा जसा मिरवूं लागला आहे, तसाच तो काबाडकष्ट करणाऱ्या आपल्या अस्सल जातीपासून दिवसेंदिवस विभक्त होत चालला आहे.

भारतीय संस्कृतींत पदवी नव्हती. पदवीच्या प्राप्तीनें श्रेष्ठत्त्व देण्याची कल्पना भारतांत इंग्रजानींच प्रतिष्ठित केली आणि त्यामुळें दिवसेंदिवस काबाडकष्ट करणाऱ्याची किंमत उतरूं लागली. समाजधारणेच्या दृष्टीनें काबाडकष्ट करणारा माणूस हा समाजाचा अत्यन्त महत्त्वाचा घटक असूनही कवडीमोल ठरूं लागला. सुशिक्षित माणूस म्हणजे इंग्रजी शिकलेला माणूस अशी व्याख्या प्रतिष्ठित झाल्यामुळें केवळ देशी भाषेंत प्रभुत्व मिळवलेल्या व्यक्तीला किंमत मिळेनाशी झाली. 'जिवाशिवाची भेट' या नाटकांतील जिवा तत्त्व ज्ञानाच्या गोष्टी कसा बोलूं शकतो असा जो प्रश्न मला करण्यांत आला तो इंग्रजी भाषेच्या आक्रमणानें निर्माण झालेल्या पराभूत मनोवृत्तींतूनच होत होता. जणूं काय इंग्रजी शिकल्याशिवाय माणसाला स्वतंत्र विचार करण्याची शक्तीच येत नाहीं ! ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम सोडून दिले तरी आजच्या काळांतील रामकृष्ण परमहंसांसारख्या अक्षरशत्रु विभूतीचें महात्म्य इंग्रजी भाषेचें झांकण डोळ्यावर घेतलेल्या व्यक्तीला कसें कळावें ? स्वामी रामतीर्थाचे गुरूही एक

असेच निरक्षर लोहार होते. आजचे संत तुकडोजी महाराज कुठें काय शिकले आहेत ? इंग्रजी भाषेनें आमचें जितकें कल्याण केलें त्यापेक्षां अनंत पटीनें सांस्कृतिकदृष्ट्या अकल्याणच केलें आहे. पांढरपेशेपणाला उत्तेजन देण्यासाठीं आणि त्यापायीं आमची काबाडकष्टी मनोवृत्ती खच्ची करण्यासाठीं इंग्रजांनीं वापरलेलें हें हत्यार अजूनही आम्हीं उराशीं कवटाळून बसलों आहों हें दुर्दैव होय.

कलेच्या क्षेत्रांत देखील या इंग्रजी पांढरपेशेपणानें इंग्रजांच्या अमदानींतच शिरकाव केला होता. जुन्या कलाकारांचा इतिहास पाहूं जातां असें दिसून येतें, कीं भारतांतील कोणत्याही प्रांतांतील कुठलाही कलाकार पांढरपेशावृत्तीचा नव्हता. इंग्रजांच्या अनुकरणानें आणि त्या अनुकरणाला उत्तेजन देणाऱ्या अधिकारी व्यक्तींच्या श्रेष्ठत्त्वामुळें कलेच्या--विशेषतः नृत्यकलेच्या क्षेत्रांत--पाश्चिमात्य बालेच्या (Ballet) अनुकरणानें जो एक कमअस्सलपणा शिरला आहे तो अस्सल भारतीय नृत्यकलेच्या स्वरूपाला हानीकारक झालेला आहे. या नकली कलेपासून अस्सल कलेकडे कलावंतांचें लक्ष जावें आणि हें पाश्चिमात्य रकटें त्यांनीं एकदम फेंकून द्यावें या उद्देशानेंच या नाटकांतील मध्यवर्ती कल्पनेची योजना केलेली आहे.

हाजी कासमवाडी, मुंबई ७.          मा मा व रे र क र

१०-३-५०

# अंक पहिला

## विष्कंभक

[ मुंबईचा एक राजरस्ता. दोन प्रहर उलटून गेलेले असल्यामुळें रस्त्यावर फारशी रहदारी नाहीं. पांडोबा विचारे हातांत वर्तमानपत्रें घेऊन विकण्यासाठीं उभा आहे. तो एक न्यूजएजंट आहे. वयानें सुमारें पन्नाशीच्या आंतबाहेर, अंगांत खादीचा सदरा, खादीची टोपी—रस्त्यावरून जाणारा कुणी माणूस दिसला, कीं तो वर्तमानपत्राचें नाव पुकारीत आहे. कुणी एकादाच एकादें वर्तमानपत्र विकत घेत आहे. दूर अंतरावर कुणीतरी गात आणि नाचत असल्याचा आवाज ऐकूं येत आहे. इतक्यांत मकाजी फूटवाला 'संत्रं मोसंबीं' करून ओरडत डोईवर पाटी घेऊन येतो. पांडोबाला पहातांच थांबतो. ]

**मकाजी :** काय पांडोबा, कुणी गिऱ्हाईक नाहीं वाटतं आज ?

**पांडोबा :** दुपारच्या वेळीं वर्तमानपत्रं खपत नाहींत म्हणून म्हणतात आमचे पोरे—म्हणून स्वतः बघतोंय कितपत खरं आहे तें.

**मकाजी :** मग काय ठरलं ?

**पांडोबा :** अगदींच खोटं नाहींसं वाटतं तें--पण दम धरून उभं राहिलं तर पांचपंचवीस छापे खपायला कांहीं हरकत नाहीं. मोठे उनाड आहेत हे आमचे पोरे. चार अंक जास्त खपले तर चार पैसे जास्त मिळतील—एव्हढंसुद्धां कळत नाहीं लेकाच्यांना. उनाड आहेत मुलखाचे ! बेट्यांना पर्वाच नाहीं पैशाची. चोवीस तास खपल्याशिवाय काय कधीं पैसा मिळतो ?

**मकाजी :** अगदीं बरोबर. मी देखील हेंच म्हणतों. पण आमची खरी गिऱ्हाइकी या दुपारच्या वेळीं. बायका मोकळ्या असतात ना यावेळी घरांत ? जरा चिकाटी धरून बसलं, तर दहा पांच डझनाचा सौदा सहज होऊन जातो.

**पांडोबा :** काय रे मकाजी, तुझ्या चाळीचं काम कुठपर्यंत आलंय ?

**मकाजी :** तुझ्या बंगल्याच्या आधीं माझी चाळ उभी राहाणार. अगदीं खात्री बाळगून ठेव.

**पांडोबा :** बघूं बघूं. दिसेलच आतां--

( तितक्यांत एक गिऱ्हाईक वर्तमानपत्र मागतो. त्याला तें देत असतांना मकाजी ' संत्रं मोसंबीं ' करीत ओरडत जातो. दुसऱ्या बाजूनें गोविंद ड्रायव्हर येतो. )

**पांडोबा :** आलास गोविंदा ? भाडंबिडं नाहीं मिळालं वाटतं आज ?

**गोविंद :** नुकतीच एक वर्दी करून आलों. तुम्ही दिसलां इथं--तेव्हां म्हटल, गाडी मोकळी आहे, येत असलां तर घरीं जायला लिफ्ट देतों तुम्हांला.

**पांडोबा :** नको रे बाबा. चांगलीं खबरदार आहेत माझीं टांगं. हवी कुणाला तुझी ती सरपटी ? अरे पण ती लॉरी घेणार होतास त्याचं काय झालं ?

**गोविंद :** घेतली की !

**पांडोबा :** कितवी लॉरी ही तुझी ?

**गोविंद :** अकरावी.

**पांडोबा :** छान ! असंच चालूं दे. आणि हें बघ --

( आंतून कुणीतरी " अरे ए टॅक्सी, ए ड्रायव्हर ! " असें बोलल्याचें ऐकूं येतें. ' आया साव ' म्हणून गोविंदा घाईघाईनें निघून जातो. गाण्याचा आणि नाचण्याचा आवाज बराच जवळ ऐकूं येतो, तिकडे पांडोबाचे कान लागलेले दिसतात. इतक्यांत एक खादीचा शर्ट आणि नेहरू जाकीट घातलेला, उघड्या डोक्याचा, काळा चष्मा लावलेला गृहस्थ येतो. )

**गृहस्थ :** काय पांडोबा, भर दुपारीं सकाळचे पेपर विकतांहां वाटतं ? कमाल आहे तुमची ! कसं उन्हांत उभं रहावतं तुम्हाला ?

**पांडोबा :** काय करतां, तुमच्यासाठीं अशीं उन्हं खावीं लागतात मला.

**गृहस्थ :** पण खपतात काय हे पेपर या वेळीं ?

**पांडोबा :** कुणीतरी मिळतोच एकादा चुकारू माणूस. तेव्हढेच दहापांच जास्त.

**गृहस्थ :** कसा काय जातोय आमचा पेपर ?

**पांडोबा :** त्याची काळजी तुम्हांला कशाला ? नफ्यातोट्याची उस्तवारी करायला आहेत कीं तुमचे मालक. तुम्ही आपले लिहीत बसा लीडरं.

**गृहस्थ** : ( आपल्याशींच पुटपुटत ) एक शब्द सरळ बोलेल तर शपथ ! ( बोलतबोलत जातो. )

(पांडोबा इकडेतिकडे पहात असतो. लांब कुणीतरी दिसल्यासारखें पाहून हांक मारतो.)

**पांडोबा** : गणू, ए गण्या ! ऐकूं येतंय कीं नाहीं तुला ? तिकडे काय बघतोस ? मी इकडे आहें उभा. या इकडे ये.

**गणू** : ( प्रवेश करून ) काय ?

**पांडोबा** :-- केवढ्या मोठ्यानं ओरडायला लावतोस मला ! हें बघ, ( बोटानें दाखवून ) त्या तिकडे जा--( गणू एकदम जाऊं लागतो. ) अरे चाललास कुठं ?

**गणू** : तिकडे जायला सांगितलंत ना मला ?

**पांडोबा** : पण कशाला जाणार आहेस तिकडे ?

**गणू** : होय तर ! कशाला ?

**पांडोबा** : जा म्हटलं कीं धांवला ! कशाला जायचं, कां जायचं, तें ऐकायचं सुद्धां नाहीं.--आतां असं कर, पलीकडे जा. तिथं कोण नाचतंय वाटतं-- पोरगी आहेशी वाटतेय कुणी--तिला घेऊन ये इकडे. ( गणू नुसता पहात राहातो. ) बघत काय राह्यलायस ? ती थांबली बघ नाचायची. चटकन घेऊन ये तिला, नाहींतर जाईल दूर कुठंतरी.

**गणू** : होय तर ! ( जातो )

( काखेला थर्मास बाटली लावून गंगू प्रवेश करते. ती पांडोबाच्या घरचा कारभार पाहाणारी त्याची एक दूरची नातेवाईक बाई आहे. वयानें सुमारें पस्तिशीची. कोंकणी पद्धतीनें लुगडें नेसलेली. )

**पांडोबा** : आलीस ? ( तिच्याकडचा थर्मास घेऊन चहा ओतून पितो. ) तुला त्रास होतो खरा—पण यावेळीं चहा नसला तर जीव जायला येतो माझा—

( गणू एका भिकारणीला घेऊन येतो. तिच्या मागोमाग तिचा एक साजिंदा. गळ्याला पेटी बांधलेला. ती मुलगी पंधरा सोळा वर्षांची आहे, अंगावर फाटके तुटके कपडे आहेत, पायांत चाळ आहेत, केंस विस्कटलेले, चेहेऱ्यावर धुरळा उडालेला, त्यांतून तिची तेजस्वी मुद्रा दिसून येत आहे. )

**पांडोबा :** इकडे ये मुली. तूं नाचतेस होय ? ( ती मानेनं होकार देते. ) नांव काय तुझं ?

**मुलगी :** नांवाशीं काय करायचंय तुम्हांला ?

**पांडोबा :** तुझ्या नांवाचा दौलतजादा करायचाय मला.

**गौरी :** नाचूं का ? ( साथीदार पेटी वाजवूं लागतो. )

**पांडोबा :** अरे बाबा थांब. ती पेटी पाहिली कीं मस्तक भडकतं माझं. या विलायती सैतानानं सत्यानाश केलाय आमच्या गाण्याचा. राहूं दे ती. तूं हो दूर. हं. आतां सांग, नांव काय तुझं ?

**मुलगी :** गौरी.

**पांडोबा :** गौरी होय ? बरं ! कुठली तूं ?

**गौरी :** इथलीच.

**पांडोबा :** इथली कुठली ?

**गौरी :** इथली म्हणजे इथलीच.

**पांडोबा :** इथली म्हणजे इथलीच होय ! बरं बरं. इथं कुठं राहातेस तूं ?

**गौरी :** मी राहात नाहीं कुठं. सारा दिवसभर अशीच फिरत असतें; नाचत—भीक मागत.

**पांडोबा :** आणि रात्रीं ?

**गौरी :** रात्रीं होय ? रात्रीं निजतें अशीच कुठंतरी फुटपायरीवर.

**पांडोबा :** फुटपायरीवर निजतेस ! अन् आंथरूणपांघरूण ?

**गौरी :** आतां बघा--फुटपायरीवर निजायला काय आंथरूणपांघरूण लागतं ? कांहीं मरायला होत नाहीं तसंच निजलं म्हणून.

**पांडोबा :** खरंय तें. मी देखील निजत असतों आमच्या छापखान्यांतल्या बाकावर ! बरं बरं. कोणकोण आहेत तुझीं ? आईबाप ? भाऊबहीण ?

**गौरी :** कुण्णीसुद्धां नाहींत. दहा वर्साची होतें तेव्हां आई मेली पटकीनं—अन् त्यानंतर एक वर्सानं बाप गेला. झिंगून पडला होता अन् मोटर गेली अंगावरून.

**पांडोबा :** म्हणजे मेला कीं काय तो ?

**गौरी :** तर काय जगतोय ?

**पांडोबा :** बरं बरं. अन् हा कोण तुझ्या बरोबरचा ?

**गौरी :** असाच आहे एक माझ्यासारखा भिकारी. मी एकटीच नाचत होतें—एक दिवशीं तो भेटला. म्हणाला, मी तुझी साथ करतों. मी म्हटलं, कर साथ. फिरतों आम्हीं दोघंजणं. काय मिळेल तें दोघं वाटून घेतों. तसा बराय तो. भारी काळजी घेतो माझी.

**पांडोबा :** असं होय ! -- हा काळजी घेतो तुझी ! आतां असं सांग, तूं कुठं शिकलीस नाचायला ?

**गौरी :** त्यांत काय शिकायचं ? माझी आई नाचे--माझा बाप वाजवी पेटी—मी देखील नाचें तिच्याबरोबर. नाचायला काय शिकावं लागतं ?

**पांडोबा :** शिकावं लागतं तर ! तें तुला कळायचं नाहीं. खूप आहेत नाचणारे. तो उदयशंकर, ती मेनका, ती मीरादेवी--खूप आहेत नाचणारे. नाच शिकून तयार झालींयत तीं माणसं. ( डोकें खाजवून ) तुझ्या पायांत अस्सल नाच दिसतोय मला. चांगल्या दर्दी माणसानं शिकवलं तर तूं चीत मारशील त्या सर्वांना. तुला मलबारलाच पाठवतों शिकायला. आहे कबूल ? ( ती स्तब्ध राहते. ) राहतेस माझ्याकडे ? ( ती बोलत नाहीं. ) हें बघ पोरी, मघांपासून तुला पहातोंय. तुझी पावलं पहातोंय--अन् तुझा चेहराही पाह्यला आतां--असं वाटलं मला, कीं मला एकादी मुलगी असती तर ती थेट तुझ्यासारखी दिसली असती. फार जीव तळमळतोय माझा मुलीसाठीं--तूं होतेस माझी मुलगी ?

**गौरी :** मी ? भिकारीण मी ? ( त्याच्याकडे डोकीपासून पायाकडे पहात ) तुमची मुलगी ?

**गंगू :** ही तुमची मुलगी ? हंसतील कीं लोक तुम्हांला. हिची जात तरी माहित आहे का तुम्हांला ?

**पांडोबा :** जातीची उठाठेव तुला कशाला ? आश्रमांतलं पोरकं पोर आणून पाळलं तर कुणाला पत्ता लागतोय त्याच्या जातीचा ? तूं रहा ग पोरी माझ्याकडे. अशी फक्कड नाचणारी बनवतों तुला, कीं सारी मुंबई घोंटाळेल तुझ्या पायाभोंवतीं. ( साथीदाराला ) अरे ए ! हें बघ,--( खिशांतल्या पाकिटांतली नोट काढून ) हें घे-- जा--अन् बघ कुठली तरी दुसरी मुलगी. ही राह्यलीय माझ्याकडे. दत्तक घेतलीय मी हिला. कळलं ? नीघ ! चालता हो म्हणतोंना !

**सार्थादार :** होय का ग गौरी ?

**पांडोबा :** तिला काय विचारतोस ? तिला काय कळतंय ? अन् तुला तरी काय कळतंय लेकाच्या ? निघ इथून ! नीघ म्हणतोंना. ( हाताच्या खुणेनें ती त्याला जायला सांगते. तो तिच्याकडे बघत बघत जातो. ) आतां असं पहा गंगे, या मुलीला घेऊन घरीं जा. चांगली आंघोळ घाल अन् सध्यां तुझं लुगडं दे तिला नेसायला एक. मी येतांना घेऊन येतों एकदोन नवीं पातळं. चांगली घासूनपुसून साफ कर--नाहींतर वॉशिंग कंपनींतच दे धुवायला. ( आपल्याच कोटीवर हंसून ) बघतेस काय ? माणसं देतात का वॉशिंग कंपनींत धुवायला ? जा, जा घेऊन तिला.

**गंगू :** चल ग पोरी, चल माझ्याबरोबर. ( तीं दोघेंही जातात. )

**पांडोबा :** ( तीं जात असतांना तिच्याकडे पहात ) एक मुलगी मिळाली मला. मुद्दाम पाठवून दिली देवानं !
( वर्तमानपत्रांचीं नावें पुकारीत दुसऱ्या बाजूनं जातो. )

( एक मिनिट काळोख )

[ पांडोबा विचारे यांच्या घरांतील दिवाणखाना. पांच वर्षानंतर. दिवाणखान्याच्या मागल्या बाजूला दरवाजा आहे. त्या दरवाजापलीकडे भिंतभर एक मोठी खिडकी आहे. दिवाणखान्याच्या दोन्ही बाजूला घराच्या दोहों बाजूला घरांत जायचे दरवाजे आहेत. आंत आधुनिक पद्धतीचें भरगच्च फर्निचर आहे. एका कोपऱ्यांत लिहिण्याचें टेबल असून त्याच्याशेजारीं खुर्ची आहे. त्या टेबलावर बरीचशीं पुस्तकें रचून ठेवलेलीं आहेत. पुन्हां प्रकाश होतो त्यावेळीं रंगभूमीवर कुणीच नसतें. रमेश प्रवेश करतो. रमेश हा पांडोबाचा मुलगा. वय पंचविशीच्या पलीकडे. अद्ययावत इंग्रजी पोषाख केलेला. इंग्रजांचें अंधानुकरण करणारा. एम्. ए. पी. एच. डी. झालेला कालेजांतील एक प्रोफेसर. आंत येतांच हॅट रॅकवर ठेवतो आणि दाराकडे पाहून रुबाबांत हाक मारतो. ]

**रमेश :** गणू ! गणू ! ! गणू ! ! ! ( गणू येतो. ) बाबा कुठंयत ?

**गणू :** मला काय माहीत ? अजून आले नाहींत. रस्त्यावरून येतांना नाहीं दिसले ?

**रमेश :** फाजील बोलूं नकोस--

**गणू :** आतांच त्या कोपऱ्यावर होते ना उभे--छापे विकीत.

**रमेश :** गप् बैस.

**गणू :** कां गप् बैस ? दिसेल तें बोलूं नये ?

**रमेश :** कळलं ! पुरे झालं !--कोण आलं होतं मला विचारायला ?

**गणू :** मला काय माहीत ? आलं असलं कुणी तर पाह्यलं असेल त्यान डोकावून—तुम्ही नाहींसे पाहून गेलं असेल निघून.

**रमेश :** फार फाजील करून ठेवलाय तुला बाबांनीं. सरळ उत्तर द्यायचं नाहीं म्हणजे काय ?

**गणू :** तर काय खोटं सांगूं ?

**रमेश :** कळली अक्कल ! नीघ इथून.

**गणू :** मग बोलावलंन कशाला ? उगीच वट दाखवतो मला ! ( जातो. )

( रमेश क्षणभर जाऊन दाराशीं पाहून येतो. टेबलाशेजारच्या खुर्चीवर बसतो, पुस्तकें चाळतो, आणि त्यांतील एक पुस्तक उभ्याउभ्याच हातीं घेऊन उघडून पहात असतो, तोंच कुंदा येते. कुंदा ही पांडोबाच्या एका मित्राची मुलगी आहे. वय वीसच्या आगें मागें. अद्ययावत पोषाख करणारी. दिसण्यांत चलाख, डोळे पाणीदार. पाठीवर वेणीचा शेपटा सोडलेली—सीनिअर बी. ए. च्या वर्गातील डॉक्टर रमेशची एक विद्यार्थिनी. )

**कुंदा :** आलांत डॉक्टर !

**रमेश :** ( चट्कन वळून पाहून ) ये. मी तुझीच वाट पहात होतों. मला वाटलं, तूं आधींच येऊन बसली असशील--

**कुंदा :** एकदां येऊन गेलें मी—पण तुम्ही नव्हतां इथं. हांक मारली पण कुणीच ' ओ ' देईना. भारीच विचित्र आहेत तुमच्या घरचीं माणसं. घर आजचं अन् माणसं अनादिकाळचीं.--मोठा संकोच होतो मला इथं यायला. मला वाटतं तुम्ही आमच्या घरीं यावं. पण बाबांना तें आवडत नाहीं. आमचं घरही आहे असंच विचित्र--म्हणजे तुमच्या घरासारखं नव्हे--पण भारी संशयी स्वभाव आहे आमच्या बाबांचा—

**रमेश :** म्हणूनच येत नाहीं ना मी तिथं. मोठा कोंडमारा झालाय हा माझा. इथं बसावं म्हटलं तर बाबांचा तो गोतावळा गोळा झाला, कीं मस्तक फिरूं लागतं

माझं. तिकडे माझ्या खोलींत जाऊन बसावं म्हटलं तर तें बरं दिसत नाहीं—

**कुंदा :** अन् कदाचित तें तुमच्या बाबांनाही रुचायचं नाहीं.

**रमेश :** तसं मात्र नाहीं हं. बाबांचा कसलाच अडथळा नसतो कुणाला. म्हणूनच ना ही अनवस्था माजलीय या घरांत! बसना—किती वेळ उभी राहाशील? ( ती कोचावर बसते. बाजूच्या खुर्चीवर रमेश बसतो. क्षणभर दोघेंही स्तब्ध. )

**कुंदा :** बाबा कुठंयत तुमचे?

**रमेश :** बाबा कुठंयत माझे! लाज वाटते मला सांगायला. सारं जग पहातंय, तिथं तुला काय दिसलं नाहीं? वर्तमानपत्रं विकतायत नाक्यानाक्यावर! हं! वर्तमानपत्रं विकतायत! हजार पोरं आहेत यांच्या हाताखालीं, पण हातांत वर्तमानपत्रांचा भारा घेऊन टाईम्स, क्रॉनिकल करीत ओरडल्याशिवाय अन्न जात नाहीं ना घशाखालीं! कशाला हा जिवाचा आटापीटा? दोन मोटरी आहेत दारापाशीं—पण तंगड्या तुडवीत रस्तोरस्तीं हिंडल्याशिवाय चैनच पडत नाहीं त्यांना. भर पहांटेपूर्वीं उठून त्या छापखान्याच्या बाकावर जाऊन रहातात निजून. उजाडायच्या पूर्वीं वाटलीं पाहिजेत ना वर्तमानपत्रं? बरोबरचीं सारीं माणसं थट्टा करतात माझी. चारचौघांत तोंड दाखवायला सुद्धां शरम वाटते—पण त्यांना कुठं काय त्याचं वाटतंय? जाऊंदे तें!—मग काय ठरलं तुझं?

**कुंदा :** माझी मी स्वतंत्र का आहें? आम्ही स्वातंत्र्याच्या गोष्टी बोलतों—सज्ञान झालेलीं मुलं आम्हीं--पण आमचीं वडील माणसं अजून आपल्या जुन्या समजुती घट्ट उराशीं धरून बसलींयत. उघड उघड सांगावं म्हणून म्हटलं तर तोंडसुद्धां उघडूं देत नाहींत. असह्य झालीय ही मुस्कुटदाबी. जीव नकोसा झालाय अगदीं-- ( क्षणभर थांबून ) बाबांकडे बोललांत का तुमच्या?

**रमेश :** कांहीं जरूर नाहीं त्यांच्याकडे बोलायची.

**कुंदा :** असं कसं म्हणतां? आपण सारं कांहीं ठरवलं अन् त्यानीं विरोध केला--

**रमेश :** कुणालाच विरोध करीत नाहींत ते. त्यांच्याकडून विरोध येईल असं मनांत सुद्धां आणूं नकोस. आतां तुझीं वडील माणसं काय म्हणतात तेंच पहा.

**कुंदा :** एव्हढी ही शेवटची परीक्षा होऊन जाऊंदे. मला वाटतं, तोंवर आपण वाट पाहिली पाहिजे.

**रमेश :** त्याला कांहीं हरकत नाहीं माझी. एव्हडीं दोन वर्षं गेलीं, तिथं या महिन्या दोन महिन्यांनीं काय होणार आहे फरक ? पण एकदां हें निश्चित झालं पाहिजे. ती पूर्वी साखरपुडा करायची चाल मोठी छान होती. बिट्टाथल होतं तें पण हल्लीं तेंही कुणी करीत नाहीं.

**कुंदा :** कशाला हवा साखरपुडा नी बिट्टाथल ? आपण खंबीर आहों तोंवर भीती नाहीं कुणाची आपल्याला. कॉलेजांत तरी सर्वांनाच कळून चुकलंय हें. मी असं म्हणत होतें --

( गोविंद माळवी दाराबाहेरून हांक मारीत येतो. गोविंद हा रमेशच्याच वयाचा आहे. तो पांडोबाच्या छत्राखालीं वाढला आहे. पेशानं टॅक्सीड्रायव्हर. पण त्याच्या स्वतःच्या मालकीच्या मालवाहातुकीच्या वीस पंचवीस लॉरीज आहेत. अंगानं सुदृढ, तरतरीत नजरेचा, टॅक्सीड्रायव्हरचा पोषाख केलेला, सदा तळपत राहाणारा, एका जागीं मुद्दां न बसणारा, सदा हंसतमुख तरुण. )

**गोविंद :** बाबा ! बाबा ! ! ( आंत येऊन ) कुठंयत बाबा ?

**कुंदा :** हा पहिला विक्षेप.

**गोविंद :** बाबा कुठंयत ?

**रमेश :** आतां झाली सुरवात ही भुतावळ यायला !

**गोविंद :** तुला ऐकूं येतंय का रमेश ? ( कुंदला ) माफ करा हं. ( रमेशला ) बाबा कुठंयत ?

**रमेश :** पहाना कुठंयत ते ! या इथं नाहींत एवढं तरी दिसतंय ना तुला ? रस्त्यांत नाहीं भेटले कुठं ? एखादा छापा नाहीं विकत घेतलास त्यांच्याकडून ?

**गोविंद :** मी कुठं कधीं वाचतोय वर्तमानपत्र ? ( बाजूच्या खुर्चीवर बसत ) वेळ कुठं मिळतोय मला ? अशा उड्या पडत असतात माझ्या टॅक्सीवर— शेवटीं पेट्रोल खलास झालंय म्हणून सांगतों, तेव्हां कुठं यायला मिळतं मला इथं. गिऱ्हाइकाला फसवायचं म्हणजे वाईट वाटतं खरं, पण थोडीतरी उसंत मिळाली पाहिजे ना माणसाला ? अशी भरून गेलीय हल्लीं मुंबई--कीडमुंगीसारखीं वळवळताहेत माणसं रस्तोरस्तीं. चांगलीं धडधाकट मजबूत टांगांचीं माणसं, पण चार फर्लांग जाण्यासाठीं टॅक्सी लागते एकेकाला. हा दुबळेपणा कीं खोटी मिजास ?

**रमेश :** आतां पुरे करशील हें तुझं टॅक्सी पुराण ? तूं टॅक्सीवाला आहेस हें माहीत आहे मला ! सर्वांना वाटेला लावतोस तेंही मला माहीत आहे. मोठमोठ्या लक्षाधिशांना मुद्दां नेऊन सहज खड्यांत घालायचं तुझ्या हातीं आहे, हेंही कळतंय मला. अगदीं तुझी इच्छा नसतांनासुद्धां मोठ्यामोठ्यांचीं गुपितं आपोआप तुझ्या कानीं येऊन पडतात त्याचीही जाणीव आहे मला—

**गोविंद :** पण मी कधीं कुणाचीं गुपितं फोडलींयत का बाहेर ?

**रमेश :** बाहेर फोडलीं नसशील, पण इथं बाबांच्या समोर येऊन सर्वांचे पाढे वाचीत असतोस, त्यावेळीं बाबा म्हणजे एक चालतंबोलतं, हिंडतंफिरतं वर्तमानपत्र आहे याची असते का तुला आठवण ?

**गोविंद :** मी बोलतों इथं—बाबांकडून कांहींच चोरून ठेवीत नाहीं मी—पण बाबांनीं कधीं बाहेर फोडलींयत का माझीं गुपितं ?--माझीं म्हणजे मी सांगितलेलीं--माझं मोटरवाल्याचं कसलं असणार गुपित ?

**कुंदा :** मोटरवाल्याबरोबरच परवां पळून गेली ना एक मुलगी ?

**गोविंद :** एकच कां, डझनावारी मुली पळून गेल्यायत मोटरड्रायव्हरबरोबर. पण तो कुणाचा दोष ? ड्रायव्हर लुच्चा असेल, पण त्या मुलीही मूर्ख नव्हत्या का ? त्यांचा कांहींच का दोष नव्हता ? दोन्ही बाजू पाहिल्या पाहिजेत बरं कुंदाताई--जाऊं दे तें. बाबा कसे नाहीं आले अजून ? गंगूताई तरी आहेत का घरांत ?

**रमेश :** पहाना जाऊन. आलों तो मी इथंच बसलोंय. आंत कोण आहे कीं नाहीं त्याची चौकशी मी कशाला करूं ?

**गोविंद :** बरं बरं, मीच जातों. ( आंत जातो. )

**रमेश :** गेला एकदांचा ! बरीच लौकर संपली याची बडबड. एकेक अशी खुळं जमवलींयत आमच्या बाबांनी—आतां हा गोविंद माळवी, कोंकणांतला मुलगा, जवळजवळ अक्षरशत्रू, इथं यांच्याकडे आला. यानीं त्याला टॅक्सी घेऊन दिली--तसा आहे हुशार--इतक्यांत पंधरावीस लाऱ्यांचा मालक झालाय. सहज रोज दीडदोनशें रुपये मिळवतो. रोज दीडदोनशें बरं---पण इंग्रजीचा गंधसुद्धां नाहीं--

**कुंदा :** एकंदरींत माणूस मोठा प्रेमळ दिसतो !

**रमेश :** पण अशिक्षित !

**कुंदा :** हो ! अशिक्षित ! पण रोज दीडदोनशें मिळवतो ! रोज ! हं ! तरीमुद्दां अजून स्वतः टॅक्सी ड्राईव्ह करतो होय !

**रमेश :** हो ! मी हेंच म्हणतों त्याला, कीं एव्हढे पैसे मिळताहेत, मग सुखानं कां घरीं बसून रहात नाहींस ? कशाला करतोस एव्हढा जिवाचा आटापिटा ? पण तें कांहीं त्याला पटत नाहीं.

**कुंदा :** कशाला हव्यात या असल्या लोकांच्या गोष्टी ? आधीं आपण आपलं हें निश्चित करून टाकू या. मी असं म्हणत होतें--

( मकाजी फाटकाला ' बाबा बाबा ' म्हणून हांक मारीत आंत येतो. हा एक भला जाडजूड घाटी आहे. सुमारें पंचेचाळीस वर्षं वयाचा. सदा आनंदी, हंसतमुख, तोंड भरून बोलणारा. )

**मकाजी :** बाबा कुठं गेले ? अरे किती शोधावं या म्हाताऱ्याला !

**कुंदा :** हा दुसरा विक्षेप !

**रमेश :** कांहीं जरुरीचं काम होतं वाटतं त्यांच्याकडे ?

**मकाजी :** कामासाठीं का येतों आम्ही लोक इथं ?

**कुंदा :** मग येतां कशासाठीं ?

**मकाजी :** तें तुम्ह इद्वान लोकांना कळायचं नाहीं. अरे, मरमर खपत असतों सारा दिवस आम्ही--घटकाभर सुखासमाधानानं चार शब्द बोलायची जागा म्हणजे हें बाबांचं घर. तुम्हां लोकांचा कलब असतो ना, तसाच आमचा हा कलब. इथं काहीं वर्गणी द्यावी लागत नाहीं कुणाला. बाबांच्या गांठची चाय प्यायची, चार इड्या--शिगरेटी असल्या तर ओढायच्या अन मग जायचं घराला सांजच्यापारीं. गौरी कुठंय ?

**रमेश :** मला काय ठाऊक ?

**मकाजी :** एका घरांतलीं माणसं तुम्ही--एकाची दाद एकाला नाहीं--अरे म्हणावं तरी काय तुम्हांला ?

**कुंदा :** काय करायचं आतां ? जाऊं कीं काय मी ?

**रमेश :** बैस ना !

**मकाजी :** आमची अडचण झाली होय तुम्हांला ? भरपूर जागा आहे घरांत. हा एवढा मोठा बंगला, बसा कीं जाऊन आंतल्या एखाद्या खोलींत अन करा की गुलगुल गोष्टी.

**कुंदा** : आतां ऐका !

**रमेश** : रोज ऐकतोंय.

**मकाजी** : गोंद्या नाहीं का आला ? अन बापू मांग ? तो सुद्धां नाहीं आला ?

**रमेश** : असं पहा मकाजीराव, बाबांचा मी मुलगा--पण त्यांच्या तें हिशेबांत नाहीं. गोविंदा आहे त्यांचा लाडका. तुम्ही, बापू मांग--असले हे त्यांचे दोस्त. रोज तुम्ही येतां इथं, तासनतास बसतां, मारे गप्पा मारतां, खातापीतां, निघून जातां. पण कोंडमारा होतोय आमचा. माफ करा हं. मी तुम्हांला येऊं नका असं कांहीं म्हणत नाहीं. घरचे मालक आहेत बाबा, अन तुम्ही त्यांचे दोस्त. तुम्ही येऊं नका असं कसं म्हणतां येईल मला ? पण तें असं होतंय, कीं आमचे जे चार दोस्त आमच्यासारखे आहेत त्यांना बंदी होतेय त्यामुळं इथं यायची.

**मकाजी** : कां ? आम्ही त्यांना येऊं नका असं कधीं म्हटलंय का ? आम्हीं येतों आहों तसे तुम्हींही या, बसा, बोला, गप्पा मारा, चायपाणी घ्या. कोण नको म्हणतंय तुम्हांला ?

**कुंदा** : पण बोलायचं काय त्यांनीं तुमच्याशीं ? त्यांची भाषा तरी कळेल का तुम्हांला ?

**मकाजी** : इंग्रजी बोलले तर नाहीं कळायचं. मराठी कळतंच कीं साऱ्यांना. अन् हिंदीबी कळतं थोडथोडं.

**कुंदा** : मराठी बोलले तरी सुद्धां नाहीं कळायचं तें तुम्हांला. त्यांची परिभाषा आहे का तुम्हांला अवगत ?

**मकाजी** : आम्हांला भाषा कळते सगळी. पण ही तुमची परभाषा म्हणतां, ती मात्र नाहीं आमच्या ओळखीची.

**रमेश** : कशाला उगीच त्यांच्याशीं बोलतेस ? संत्री मोसंबीचा दर विचार त्यांना—

**मकाजी** : हां--तें माझं काम. नुसतीं संत्रीं मोसंबींच काय, पण जेवढीं म्हणून फरूटं येतात या मुंबईत तेव्हढ्या साऱ्यांचे दर माहित आहेत मला—अगदीं संत्र्यांपासून बोरापर्यंत--अन् तुमची ती पीच अन् इस्टाबेरी—

**कुंदा** : आतां ऐक.

**रमेश** : ऐकतोंय कीं. आणि आतां बाबा आले--

( पांडोबा येतो. त्याच्या काखेला वर्तमानपत्रांचें पुडकें आहे. पुडकें

फेंकून तो पुढें येतो. डोक्यावरची खादीची टोपी अशीच कुठेंतरी फेंकून देतो आणि एका खुर्चीत अंग टाकतो. )

**पांडोबा :** आलों बरं बेट्या. बाबा आले कीं काय व्हायचंय रे ? बोल ना ! आतां गप्सा राहिलास ? बाबा आले, कीं गांवगप्पा सुरू होतील--बाबा आले कीं तेलीतांबोळी गोळा होतील--बाबा आले, कीं तुला मोकळीक मिळायची नाहीं--हेंच ना तुझं म्हणणं ? अरे बाबा जसा आपलीं माणसं गोळा करतोय, तसा तूं सुद्धां तुझीं आवडतीं माणसं गोळा करून कां नाहींस अड्डा बसवीत ? तुला नको का म्हटलंय मी ? एक स्वतंत्र खोली दिलीय ना तुला ?—

**रमेश :** पण इथं हीं माणसं बसलेलीं असतांना—

**पांडोबा :** तीं बसायचींच इथं. त्यांची सावली सुद्धां बाधते का तुम्हां लोकांना ? जा कीं सरळ आमच्या अंगावरून. नको म्हटलं तर कान धर माझे.

**रमेश :** पण ते येतच नाहींत ना इथं कुणीं !

**पांडोबा :** कां ? हा म्हारवाडा आहे होय ? आणि तुम्ही ब्राह्मण ! युनिव्हर्सिटीचे ब्राह्मण ! जातीचा मराठा असलास तरी नावामागं चारदोन अक्षरं जोडायला मिळतांच बामण होऊन बसलायस ! आम्ही म्हणजे म्हारघेड वाटतों तुला ! बरं बरं ! तें राहूं दे. तूं जाऊन बैस तिकडे आपल्या खोलींत.

**रमेश :** खोलींत ! ही अन् मी एकटींच खोलींत बसलों तर गंगूताईच्या अंगाचा भडका होतो.

**पांडोबा :** अरे व्हायचाच ! जुन्या काळची आहे ती—म्हणजे वयानं नव्हे--मनानं ! कशाला लक्ष देतोस तूं तिच्याकडे ? धुसफुसेल धुसफुसेल नी स्वस्थ बसेल. आपला माझा धडा घे तूं. जें आपल्या मनाला पटेल तें करायचं. कुणाचीसुद्धां पर्वा करायची नाहीं—तो गोंद्या आला होता का ?

**रमेश :** आलाय ! आंत बसलाय.

**पांडोबा :** त्याला दे पाठवून इकडे अन् तुम्ही बसा दोघंही आपल्या खोलींत अन् चालूं दे तुमची साहित्यचर्चा. अरे, मी आहें म्हणून चाललंय हें तुमचं ढोंग. हीं वर्तमानपत्रं आणून टाकतोंय रोज तुमच्या घरीं, म्हणून चालल्या आहेत ना तुमच्या चर्चा ? जा आतां. ती गौरी नाहीं का आली अजून ? ( रमेश कांहीं न बोलतां आंत जातो, कुंदा त्याच्या मागोमाग जाते. ) पाह्यलंस

मकाजी, गौरीचं नांव घेतलं, कीं याच्या पायाची तिडीक अशी ही मस्तकाला जाते. कसा तणतणत गेला तें पाह्यलंस ?

**मकाजी:** गौरीच कां, आम्ही लोक सुद्धां सलतों त्याच्या डोळ्यांत. माझा मुलगा असा असता तर त्याला मी लाथ मारून घराबाहेर काढला असता. म्हणे एम्. ए. डॉक्टर झालाय. कसला हा डाक्टर ? पडशाला औषधसुद्धां देतां येत नाहीं, नी म्हणे डाक्टर—

**पांडोबा :** जाऊंदे रे,--पोर आहे, कधींना कधीं तरी उघडतील त्याचे डोळे.

**मकाजी :** काय उघडायचे डोळे ? एव्हढा शिकला, हजारों रुपये खरचलेत तुम्ही अन् मिळवतो काय, तर दरमहा तीनशें. एक दिवसाची कमाई माझी ! कशाला घातलेन इतके पैसे खर्ची ? धंदा नव्हता तुमचा ? एव्हढी लाखांची इस्टेट केली तुम्ही छापे विकून—

**पांडोबा :** जाऊंदे रे—पोर आहे--हौस होती त्याची, म्हटलं जितकं शिकायचं तितकं शीक. हिंदुस्थानांत जितक्या डिग्र्या मिळवायच्या तितक्या मिळवल्याच कीं नाहीं बेट्यानं ? आतां अमेरिकेला जायचं म्हणतोय.

**मकाजी :** मग पाठवणार कीं काय तुम्ही त्याला ?

**पांडोबा :** उठला सुटला प्रत्येकजण चाललाय अमेरिकेला--त्यालाही एकदां येऊं दे जाऊन. काय दिवे लावणार आहे तें माहीत आहे मला. पण त्याचा शब्द नको माझ्यावर राहायला. बापानं माझ्यासाठीं अमूक केलं नाहीं असं म्हणायला नको त्यानं. ( गोविंद येतो. ) आलास ? काय करीत होतास ?

**गोविंद :** भजीं खात होतों. काय सुन्दर भजीं केलीं होतीं गंगूताईनं ! बरं का बाबा, आज एक नवी लॉरी घेतली मी.

**पांडोबा :** घे लेका, लॉऱ्या घे. चलती आहे तुम्हा मोटरवाल्यांची आज. आणखी काय घेतलंयस ?

**गोविंद :** आणखी काय घ्यायचं ? एक धन्दा पत्करलाय तेव्हढ्यापुरतं पहातोय मी.

**मकाजी :** अरे एव्हढा चांगला धंदा चाललेला, तरी अजून भाड्याच्या खोलींत रहातोयस अन् हॉटेलांत जेवतोयस. अन् लग्न केव्हां करणार आहेस ? घर केव्हां बांधणार आहेस ?

**गोविंद :** लग्न करायला फुरसत कुठंय मला ? अन् कोण करणार आहे माझ्याशीं लग्न ?

**मकाजी :** तोटा आहे कीं काय पोरींना ? आतां कायदा झालाय म्हणून, नाहींतर एका बोहल्यावर चार पोरी आणून उभ्या केल्या असत्या तुझ्यापुढं.

**पांडोबा :** तसल्या पोरी नकोयत त्याला.

**मकाजी :** मग कसल्या हव्यायत त्याला ?

**पांडोबा :** ही आतां आली होती ना इथं, तसली झकास पोरगी हवीय त्याला.

**गोविंद :** बाबांचं आपलं भलतंच कांहीं तरी. मी कधीं म्हटलं होतं असं ?

**पांडोबा :** तुझ्या मनांतली गोष्ट सांगतोंय मी. तुम्हां पोरांची मतं चांगलीं कळतात आम्हां म्हाताऱ्यांना. आम्हीं सुद्धां तरुण होतोंच की एकदां. आज तुझ्या जागीं मी असतों तर मला काय वाटलं असतं त्याचा अंदाज घेऊन बोलतोंय मी. बरं का मकाजी, हा आहे टॅक्सीवाला. श्रीमन्ताचीं म्हण कीं विद्वानाचीं म्हण, तरणींताठीं जोडपी रोज जातात याच्या टॅक्सींतून. त्यांच्या खुसखुशीत, गुलगुलीत गोष्टी चाललेल्या असतात त्या रोज येतात ना याच्या कानावर ? समोरच्या आरशांतून बघत असतो ना मागं काय चालतं तें ? अन् मग वाटतं या तरण्या पोरांना, कीं आपलंसुद्धां असंच कांहींतरी व्हायला हवं. कुणी लुच्चेलफंगे असतात ते फुसलावून नेतात देखील असल्या पोरींना ! हा त्यांतला नाहीं. पण जें मनांत यायचं, तें आल्याशिवाय का राहातंय ? काय रे गोविंदा, खरं ना मी म्हणतों तें ? ( गोविंद स्तब्ध ) पाहिलंस मकाजी ? तो खोटं बोलायचा नाहीं माझ्यासमोर. होय म्हणायला लाजतोय, पण खोटं ढोंग केलं नाहीं यानं. बरं बरं, होऊन जाईल तुझ्या मनासारखं. अरे, पैशाच्या चलतीचे दिवस आहेत. मनांत आणशील ती पोरगी विकत घेतां येईल तुला.

**गोविंद :** मला विकत घ्यायचं नाहीं कुणाला.

**मकाजी :** मग काय हवंय तुला ? तुझ्या गळीं येऊन पडली पाहिजे कुणी पांढरपेशाची पोरगी ? अक्षरशत्रू गाडीवाला तूं, डिग्रीवाल्यांच्या डिग्रीवाल्या पोरी काय भाळणार आहेत तुला ? ( गोविंदा स्तब्ध. ) बरं बरं, राहूंदे तें. पण तसं म्हणून तरी कसं चालेल ? आतां फार दिवस लग्नाशिवाय राहून चालायचं नाहीं तुझं. त्या डिग्रीवाल्या ब्राह्मणांसारखं 'एव्हां नाहीं मला लग्न

करायचं ' असं म्हणून चालायचं नाहीं. लग्न केलं पाह्यजे अन् घरही केलं पाह्यजे. आतां स्वतःचं घर बांधणं कांहीं तुला कठीण नाहीं—

**गोविंद :** कशाला हव्या त्या गोष्टी ? दुसरं कांहींतरी बोला की.

**पांडोबा :** आमची गौरी कशी काय रे वाटते तुला ?

**गोविंद :** ती ? आतां काय म्हणावं तुम्हांला बाबा ! ती शोभणार आहे का माझ्यासारख्याला ?

**पांडोबा :** कां ? नाचणारी म्हणून ?

**गोविंद :** मोठमोठे लक्षाधीश आणि कोट्याधीश भिंगरी घालतायत तिच्या पायांतल्या घुंगुराभोवतीं. मी कुठंय तिच्या खिजगणतींत?

**मकाजी :** म्हणजे ती तुला आवडतेय ?

**गोविंद :** असं कुठं म्हटलं मी ?

**पांडोबा :** मग काय म्हणतोयस तूं ? समज, मी उद्यां ठरवलं, कीं तुझं गौरीशीं लग्न लावून द्यायचं--

**गोविंद :** ( चेहरा पाडून ) असं कांहीं बोलूं नका बाबा.

**पांडोबा :** कां ?

**गोविंद :** तिला ओळखतां ना तुम्ही ? ती एक नर्तिका आहे. सारं हिंदुस्थान तिच्यावर फिदा आहे. आपल्या कलेंत मश्गूल होऊन राहिलीय ती. आपल्या कलेखेरीज कांहीं सुद्धां दिसत नाहीं तिला. ती स्वतः नाचते कीं जगाला नाचवतेय तेंच सांगतां यायचं नाहीं कुणाला. वेडी झालीय ती आपल्या कलेवर. रमेशची भाषा जशी मला कळत नाहीं तशीच तिची भाषा देखील माझ्या ओळखीची नाहीं. तिची जोडीदारी कशी साधेल मला ? मी हा असा जमिनीवरून सरपटणारा प्राणी, अन् ती तरंगत असते हवेवर.

( ' बा ऽ बा ऽ ऽ ' अशी मोठ्यानं मोठी गोड हांक मारीत गौरी धांवतच येते आणि एकदम येऊन पांडोबाच्या मांडीवर बसून दोन्ही हातांनी त्याचे गाल धरून बोलूं लागते. )

**गौरी :** आज काय झालं माहीत आहे ?

**पांडोबा :** काय झालं ?

**गौरी :** तुम्ही सांगा.

**पांडोबा :** मी कसं सांगूं ? आज कुठं गेली होतीस तूं, तें सुद्धां माहीत नाहीं मला. मग त्या तिथं काय झालं तें कसं सांगतां येईल मला ?

**गौरी :** गव्हमेंट हाऊसवर गेलें होतें मी. आतां सांगा, काय झालं असेल तिथं ?

**पांडोबा :** तूं नाचली असशील तिथं.

**गौरी :** नाचलें तर खरीच. पण काय झालं असेल ?

**पांडोबा :** तें आतां तूंच सांग ना.

**गौरी :** हा एव्हढा मोठा हार घातला त्यांनीं माझ्या गळयांत.

**पांडोबा :** मग कुठंय तो ?

**गौरी :** लिलाव केला मी त्याचा. अशी तारीफ केली गव्हर्नर साहेबांनी माझी--मेल्याहून मेल्यासारखं वाटलं मला ऐकतांना. असं सांगा बाबा, हे मोठे मोठे लोक जे आमच्यासारख्यांची तारीफ करतात ती अगदीं मनापासून असते का हो बाबा ? अगदीं खरंखरं बोलत असतात का ते ?

**पांडोबा :** काय बोलले ते ?

**गौरी :** मी म्हणजे एक या साऱ्या भारतांतली अद्वितिय नर्तिका आहें, असं म्हणाले ते. भारताचं भूषण आहें. असं म्हणाले—

**गोविंद :** ती सुनीतादेवी आली होती तिलाहीं असंच म्हणाले होते. आमच्या या भारतांत भूषणांना काय तोटा आहे !

**गौरी :** ( त्याच्याकडे लक्ष न देतां ) त्याचा परिणाम झाला साऱ्या लोकांवर. हाराचा लिलाव मी पुकारला--त्याचे किती रुपये आले असतील !

**गोविंद :** शंभर.

**पांडोबा :** पांचशें.

**गौरी :** साफ चूक. सहा हजार रुपये आले त्याचे.

**पांडोबा :** कुठंयत ते ?

**गौरी :** ते देऊन टाकले मी मजदूर सेवक संघाला.

**पांडोबा :** कर्णाची बेटीच कीं नाहीं तूं !

**गौरी :** म्हणजे तुमची !

**पांडोबा :** मी भला मोठा कर्ण आहें खरा--विचार माझ्या मुलाला---त्याला वाटतं मी लंबकर्णच आहें.

**गौरी :** असं कांहीं बोलायचं नाहीं.

**पांडोबा** : कां बोलायचं नाहीं ? खरंच आहे तें. महा गाढव आहें मी. जगाच्या दृष्टीनं मी महामूर्ख आहें—म्हणजे विद्वान जगाच्या ! —वर्तमानपत्राचा फेरीवाला मी. मूर्ख नव्हे तर दुसरा कोण ? हीं असलीं मकाजी, बापू मांग, गोविंदा सारखीं माणसं कवटाळून घेऊन बसलोंय--( गौरी त्याच्या तोंडावर हात ठेवते. )

**गौरी** : केव्हढा आनंद झाला होता आज मला. हारावर हार पडत होते माझ्या गळ्यांत—

**गोविंद** : बिदागी काय मिळाली ?

**गौरी** : आतां ऐका बाबा ! हा बिदागी विचारतोय ! बिदागीसाठीं का मी गेलें होतें तिथं ? माझ्या कलेचं चीज व्हावं,—चोज व्हावं,—कौतुक व्हावं,—म्हणून ना मी गेलें होतें तिथं ? मला जें हवं होतं तें मिळालं.

**गोविंद** : कुणाकडून ? सर्वांची सरसकट तारीफ करणाऱ्या त्या चार शिष्टां-कडून ?

**गौरी** : गप् बैस गोविंद. तुला कांहीं कळत नाहीं यांत. मोटरी हाकवतां हाकवतां बथ्थड झालंय तुझं डोकं.

**गोविंद** : डोकं बथ्थड असलं तरी काळीज जिवंत आहे माझं. त्या माझ्या जित्या काळजाचं समाधान नाहीं होत असल्या या खोट्या कौतुकानं.

**गौरी** : याला गप् बसायला सांगा पाहूं बाबा. हे दोघे राहूकेतू हात धुऊन लागलेयत माझ्या पाठीशीं. तो एक प्रोफेसर अन् हा एक गाडीवाला. आपापल्या परीनं दोघेही सारखेच. मत्सरानं जळतायत ! पिचतायत !

**गोविंद** : ( काकुळतीनं ) गौरी !

**पांडोबा** : गौरी, तुला पारख नाहीं माणसाच्या काळजाची. गोंदूला बसवूं नकोस राम्याच्या पंक्तीला. त्याचं काळीज आहे दगडाचं. या माझ्या गोंदूचं काळीज म्हणजे तुकडा आहे सोन्याचा.—लोण्यासारखा मऊ,—सोन्यासारखा बावनकशी. एव्हां कळायची नाहीं तुला त्याची कसोटी.

**मकाजी** : ती वावरते मोठ्या लोकांत. आम्ही आपलीं कामकरी माणसं. कोण गाडी हांकतो, कोण पाट्या वाहतो, तर कोण गिरणींत मरतोय रात्रंदिवस. तुम्ही फिरतांहांत की रस्तोरस्तीं छापे विकीत. --गिरणगावांत कधीं नाचली होतीस का पोरी ?

**गौरी :** गिरणगांव ? तें कुठंय ? गिरगांव माहीत आहे मला. तिथंच आहेत की आमचीं थिएटरं—अन् कोटांत !

**मकाजी :** गिरगांवांत अन् गिरणगांवांत शंभर मैलाचं अंतर आहे बरं पोरी. गिरगांवांत आहेत इवान अन् जितीं मागसं आहेत गिरणगांवांत.—निढळचा घाम काढून पोट भरणारीं मागसं. त्यांच्यासमोर नाचलीयस का कधीं ?

**गौरी :** हे काय म्हणताहेत बाबा ?

**गोविंद :** बाबांना कशाला विचारतेस ? मला विचार. मी नुसता सांगून रहायचा नाहीं, प्रत्यक्ष दाखवून देईन तुला.

**गौरी :** पण या शंभर मैलाचं भाडं काय घेशील ?

**गोविंद :** तें भाडं मीटरांत सापडायचं नाहीं. मोजमाप व्हायचं नाहीं त्या मजलीचं. बिनमोल होईल ती मजुरी माझी.

**पांडोबा :** तूं उगी रहा गोंदू. तिला कळायची नाहीं तुझी भाषा. तिचं नि आपलं खातं वेगळं आहे. ती रहातेय या छापेवाल्याच्या घरांत पण वावरतेय अस्मानच्या पऱ्यांमधून. माणसांतल्या देवदेवतांतून. राहूं दे तिला तिथंच. अजून वेळ आली नाहीं. केव्हांतरी एकदां ती देखील वेळ येईल आणि त्यावेळीं कसोटी लागेल तिची. तुम्हां आम्हां पडतां नये या भानगडींत.

( बापू मांग वामणगांवकर आणि त्याची मुलगी मैना प्रवेश करतात. बापू हा एक तमाशेवाला आहे. मैना तमाशांत काम करीत असते. बापूचं वय आहे सुमारें पंचेचाळीस वर्षांचं. मैना आहे पंधरासोळा वर्षांची. )

**पांडोबा :** ये बापू, तुझीच वाट पहात होतों. या तुझ्या पोरीलाही आणलीस ना आज ? बसा. ( बापू खुर्चीवर बसतो. मैना जमिनीवर बसूं लागते. ) अग वर बस की पोरी. काय म्हटलंस नांव हिचं ?

**बापू :** मैना.

**पांडोबा :** मैना होय ! पाहिलीस गौरी. ही सुद्धां नाचते, पण तो तुझा नाच नव्हे. हा आपला आमचा खुळ्याभोळ्यांचा तमाशांतला नाच. अन् गाते देखील होय ना ग ? ( ती मानेनं होकार देते. ) आज उशीरसा झाला तुला बापू ?

**बापू :** आज तमाशा नव्हता आमचा. तो आमचा कंत्राटदार—काकडीवाला, त्यानं धरलंय ना अडवून ? सारीं थेटरं आहेत त्याच्या ताब्यांत. त्यानं दिल

थारा तरच व्हायचा ना आमचा तमाशा ? त्यानं धरलंय अडवून. मी सुद्धां कांहीं कमी नाहीं. मी म्हटलं होऊन जाऊं दे. बघूं कोण हटतो तें. आण कुठले तमाशे आणतोस तें. माझ्या मैना, नयना नसल्या तर कसं थेटर भरतं तें तरी पहातों. उचलून घर घेतील डोक्यावर सारे लोक.

**पांडोबा** : आज गव्हर्नर साहेबांनी खूप कौतुक केलं आमच्या गौरीचं—होय ना ग ?—सांग ना ती सारी हकीगत याला. ( गौरी मान खालीं घालते. )

**मकाजी** : एकदां या मैना-नयनाचा तमाशा केला पाहिजे गव्हर्नर साहेबांपुढं. ( गोविंद मोठमोठ्यानं हंसतो. ) हंसतोस काय गोंद्या ? ही नाचली ना तिथं ? मग हिनं कां नाचूं नये तिथंच ?

**गोविंद** : तें कळायचं नाहीं तुम्हांला मकाजीबुवा. तें असं आहे—दोन्ही थडींना होडी चालत असते माझी. दोघेही ओळखीचे आहेत माझ्या. मी शिवडीला चवल्या फेकल्यायत, तसेच रॉयल ऑपेराच्या तिकिटासाठीं पंचवीस पंचवीस रुपये खर्ची घातलेयत. कशाला हव्यायत त्या गोष्टी ? शिवडीला जें मिळतें तें चौपाटीवर नाहीं सापडायचं. तुका म्हणे तेथें पाहिजे जातीचें.

**गौरी** : हें काय चाललंय बाबा ? आज काय बोलताहेत हे एकेक ? कुठंय ही शिवडी—

**पांडोबा** : पूर्वी एकदां पाहिली होतीस तूं ती. पांच वर्षं होऊन गेलीं त्या गोष्टीला. पण ती शिवडी आहे हें तुला माहीत नव्हतं. तूं रस्त्यांत तुडवीत होतीस तिथले. तिथल्या फुटपायरीला डोकंसुद्धां टेकलं असेल तुझं केव्हांतरी--

**गौरी** : ( त्याच्या तोंडावर हात ठेवून ) त्या गोष्टी काढायच्या नाहींत बाबा. तें झालं, गेलं--स्वप्न होतं तें. विरून गेलं तें स्वप्न. त्या स्वप्नाची आठवणसुद्धां होऊं देत नाहीं मी आतां. कांटा येतो अंगावर ती आठवण झाली तर.

**बापू** : तें विसरून चालायचं नाहीं पोरी. वैशाखाची पालवी दिसली म्हणून माघाची थंडी विसरून नाहीं चालायचं. ती थंडी जाणवली होती म्हणून आजची ही वैशाखाची ऊब गोड वाटतेय --

**पांडोबा** : पुरे कर बापू ! माझंच चुकलं. केव्हांसुद्धां ती गोष्ट काढायची नाहीं म्हणून ठरवून टाकलं होतं मी...पण फट्‌कन तोंडांतून शब्द बाहेर गेला अन् मग पश्चात्ताप झाला मला. तें सारं विसरून जा पोरी. अन् असं बघ बापू, तुझी ही पोर आलीच आहे...एक फक्कडशी लावणी ऐकव आम्हांला.

**बापू :** हं, म्हण ग मैने. होऊन जाऊं दे. त्या शिनेमांतल्या गाण्यांनीं नाश केलाय आमच्या सगळ्या तमाशांचा. मराठमोळ्यांची अस्सल लावणी एकदां ऐकव या साऱ्यांना. हं . कर सुरवात.

( मैना लावणी म्हणूं लागते. ही लावणी संपण्याच्या सुमाराला रमेश आणि कुंदा चोरट्या पावलांनीं बाहेर येऊन हळूच सटकूं पहातात. पण कुंदा थांबते. रमेश तिला खुणावून बोलावूं लागतो, पण ती तशीच ऐकत उभी राहाते. गाणें संपतांना सर्वांची नजर त्यांच्याकडे जाते. )

**पांडोबा :** कोण कुंदा का ? निघालीस ?

**कुंदा :** मोठं गोड लागलं हें पद !

**बापू :** होय ? पुन्हां म्हणायला सांगू ?

**पांडोबा :** आतां नको. जाऊं दे त्यांना. हें असलं गाणं ऐकायला ती बसली तर हा मुलगा वाभाडे काढील माझे.

**रमेश :** ( रागारागानें ) तुला हीं असलीं गाणीं ऐकायचीं असलीं तर खुशाल ऐकत बस. मी चाललों.

**पांडोबा :** हें पहा रामा, आम्ही चाललों आहों आंत. तुला जर बोलत बसायचं असलं तर तूं खुशाल बैस इथं. आम्ही आहोंत म्हणूनच ना जातोयस ? चला रे सारे आंत. फराळाचं निवून गेलं असेल. आमची बैठक बसली, कीं गंगीचा फराळ तयार असायचाच. चला रे.

( सारे एकामागून एक आंत जातात. गौरी अगदीं शेवटीं आहे. कुंदा तिला दाराशींच गाठते आणि तिचा हात धरून तिला थांबवून ठेवते. )

**कुंदा :** जरा थांबा.

**पांडोबा :** ( आंतून ) गौरी, येतेयस ना ?

**गौरी :** हो, आलें. ( कुंदला ) काय आहे ?

**कुंदा :** मला बोलायचंय तुमच्याशीं.

**गौरी :** आत्तांच ?

**कुंदा :** हो. आत्तांच.

**गौरी :** ( दाराशीं जाऊन ) तुमचा चालूं द्या फराळ बाबा, मला नकोय कांहीं. मी बसतें तोंवर इथंच.

**पांडोबा :** ( आंतून ) ताव मारलायस होय गव्हर्नरच्या बंगल्यावर ? आत हीं भजीं पोहे कसे आवडतील तुला ? बैस तिथंच. नको येऊंस.

**गौरी :** रागावले वाटतं बाबा. पण खरोखरच मला भूक नाहीं आतां. ( कुंदेला ) काय म्हणत होतां तुम्ही ?

**रमेश :** तुला यायचंय कीं नाहीं ?

**कुंदा :** बसायचं असलं तर बसा. कांहीं गुपित नाहीं माझं. चालेल तुम्हीं ऐकलं तर. अन् ऐकायचं नसलं तर चालते व्हा.

**रमेश :** ठीक आहे. ( तणतणत जातो. )

**कुंदा :** या आतां आपण बसूं या इथं. ( कुंदा एका खुर्चीवर बसते पण गौरी तशीच उभी रहाते. ) बसा ना. ( हंसून ) तुमच्याच घरांत मी तुमचं स्वागत करतेंय ! गंमत आहे म्हणायची ! बसा ना !

**गौरी :** काय आहे तुमचं काम माझ्यापाशीं ?

**कुंदा:** तसं काम असं कांहींच नाहीं, पण मला बोलायचंय तुमच्यापाशीं. एका फार मोठ्या महत्त्वाच्या विषयाबद्दल बोलायचंय तुमच्याशीं ! ( क्षणभर स्तब्धता ) बसा ना.

**गौरी :** ( बसते ) काय आहे ?

**कुंदा :** विषयाला सुरवात कशी करायची हेंच मोठं कोडं पडलंय मला. ( क्षणभर थांबून ) आजवर मी तुमचं नांव ऐकत होतें. तुमचे शो कांहीं पाहिलेले नाहींत मी. पण तुमची कीर्ती मात्र खूपच ऐकलीय—

**गौरी :** हेंच का बोलायचंय तुम्हाला ? कीर्तीचा आणि स्तुतीचा भलामोठा डोस घेऊन नुकतीच आलें होतें—मोठा कैफ चढला होता मला—पण आतां तो उतरलाय. पुन्हां ती भांग चढवायला नकोय मला. काय आहे ?

**कुंदा :** डॉक्टर रमेश हे तुमचे बंधू हो, बंधूच म्हणायचे तर काय ! माझ्या कॉलेजमधले प्रोफेसर आहेत ते. माझे शिक्षक आहेत. एक स्टूडंट या नात्यानं त्यांचा माझा संबंध. मी त्यांची आवडती शिष्या—आवडती शिष्या या नात्यानं ते माझ्याकडे पहात होते, गुरू या नात्यानं मी त्यांच्याकडे पहात होतें. शिष्याच्या नात्याचं तें आकर्षण हळूहळू बदलूं लागलं. अन् आतां असं झालंय, कीं लग्न केव्हां व्हायचं एवढंच काय तें ठरायचं राहिलंय—( थांबते. )

**गौरी :** झालं ? एव्हढंच ?

**कुंदा :** नाहीं. तुम्ही सारीं माणसं बाहेर बसलां होतां त्यावेळीं आंत आम्ही बोलत होतों. याच विषयाची चांगली कसून चर्चा करीत होतों. साधकबाधक गोष्टींचा अगदीं कीस काढून अंदाज घेत होतों ! तें कसं मला कळलं तें मोजक्या शब्दांत सांगतां यायचं नाहीं. पण मला दिसून आलं तें असं, कीं त्याचं मन अजून हेलकावतंय. ( थांबते. )

**गौरी :** कुणीकडे हेलकावतंय त्यांचं मन ?

**कुंदा :** संशयच तो माझा नुसता--तसं स्पष्ट शब्दांत कांहीं बोलले नाहींत ते-पण मला वाटलं, तुमच्याकडे हेलकावतंय त्यांचं मन. मी कीं तुम्ही असा प्रश्न पडलाय त्यांना.

**गौरी :** भलताच समज करून घेतलेला दिसतोय तुम्ही. तसं कधींच मला जाणवलं नाहीं या क्षणापर्यंत.

**कुंदा :** आश्चर्य आहे ! मला नाहीं तसं वाटत. अगदीं अचुकच नसली तरी पुष्कळशी बरोबर आहे माझी अटकळ. माझ्याबद्दल त्यांना आकर्षण वाटतं--फार फार वाटतं--पण त्यांना पत्नी पाहिजे आहे ती फार मोठ्या लौकिकाची. तो तुमचा लौकिक भरला आहे त्यांच्या डोळ्यांत.

**गौरी :** नुसता लौकिक ?

**कुंदा :** हो नुसताच लौकिक ! म्हणूनच मी म्हणतें, कीं त्यांची ही आवड शेवटीं दगा देईल. लौकिक म्हणजे कांहीं सर्वस्व नव्हे. लौकिकानं माणूस भारून जातो, पण इथं पाहिजे असतो तो प्रेमाचा पाझर. लौकिकाच्या दिवटीनं कांहीं प्रेमावर प्रकाश पडत नाहीं.

**गौरी :** अगदीं अक्षरशः खरं आहे तुमचं म्हणणं.

**कुंदा :** बराच विचार केलेला दिसतो तुम्हीं या बाबतींत.

**गौरी :** विचार करायची जरूरच पडत नाहीं मला. माझ्या भक्तांचा एव्हढा मोठा मेळावा गोळा होतो माझ्या भोंवतीं, कीं मी भेदरून जातें त्यांच्या त्या लघळपणामुळं. मोठमोठे लक्षाधीश आणि कोट्याधीश माझ्या पायाशीं घोटाळत असतात. नुसता माझ्या हाताला हात लावावा म्हणून जीव टाकीत असतात. लग्नाच्या मागण्या तर इतक्या येऊन गेल्यायत मला--शिसारी येतेय मला त्या माणसांची. मोठेमोठे लोक माझी तारीफ करतात म्हणूनच त्यांना वाटतं, कीं मी

कुणीतरी एक अजब कलाकार आहे. अन् अशी ही अजब कलाकार असलेली व्यक्ती आपली मालमत्ता व्हावी, आपल्या श्रीमंतीच्या पकडींत सांपडावी, एव्हढ्यासाठींच ते मला मागणी घालतात. लाथ मारून दूर लोटतें मी त्यांना, तरी सुद्धां ते पुन्हापुन्हां येऊन घोटाळत रहातात. लौकिकाची चाड वाटत नाहीं मला ती याचमुळं. म्हणूनच मी म्हटलं, कीं तुमचं म्हणणं बरोबर आहे.

**कुंदा :** एव्हढ्या वर्षाच्या सहवासांत डॉक्टर रमेशबद्दल कांहींच का आकर्षण वाटलं नाहीं तुम्हांला ?

**गौरी :** कसला एवढ्या वर्षाचा सहवास ? पांच वर्षं झालीं--बाबांनी मला आपली मुलगी म्हणून राहवून घेतलं. त्यानंतर महिनोन् महिने मी होतें मलबारांत नंबुद्री गुरुजींकडे. मधून मधून इथं येत होतें तेव्हढाच काय तो त्यांचा सहवास. त्यांतूनही त्यांचा मार्ग वेगळा, माझा मार्ग वेगळा. बाबांचा मला भारी लळा अन् त्यांना तर बाबांजवळ येऊन बसणं देखील आवडत नसे--आजसुद्धां आवडत नाहीं. कसला तो सहवास ! ( थांबते )

**कुंदा :** असं आहे तर ! एव्हढंच बोलायचं होतं मला. ( गौरी उठूं लागते.) जरा थांबा. आणखी एक गोष्ट विचारायचीय. अगदीं प्रांजळ मनानं उत्तर हवंय मला.

**गौरी :** ( उभ्याउभ्याच ) विचारा.

**कुंदा :** मी असं विचारतें—

**रमेश :** ( एकदम आंत येऊन ) अजून तरी तुला यायचं आहे कीं नाहीं कुंदा ?

**कुंदा :** ( निश्चितपणें ) नाहीं.

**रमेश** नाहीं ? ठीक आहे ! ( तो एकदां दाराकडे वळतो, पुन्हां तसाच तडक फिरून मागें येतो. ) गौरी, काय बोलणं चाललं होतं तुमचं ? काय सांगितलंस हिला माझ्याबद्दल ? एव्हढ्यांत कां बिथरली ही ? ( गौरी नुसती हंसते. ) हंसण्यावारी नेऊं नकोस. तूंच कांहीं तरी बोललीयस.

**गौरी :** कुणी बोललं असेल कांहीं तुझ्याबद्दल, तर यानींच तुझी चहाडी केलीय माझ्याजवळ.

**कुंदा :** ( ताड्कन उठून गौरीला. ) थांबा. ती चूक झाली माझी. माझा गैरसमज झाला होता तो. मी बोललें तें विसरून जा सारं. येतें मी. नमस्ते. ( एकदम जाते. )

( रमेश क्षणभर ती गेली तिकडे पहात असतो. नंतर एकदम वळून गौरी-समोर गुरगुरत येतो. )

**रमेश :** काय सांगितलं तिनं तुला ?

**गौरी :** तें विचार ना तिलाच.

**रमेश :** पण तूं सांगितलंस तर काय बिघडेल ?

**गौरी :** सांगू ? एक तर. ( तोंडानें नाचाचे बोल म्हणून नाचूं लागते. )

**रमेश :** मूर्ख आहेस ! ( रागारागानें दुसऱ्या बाजूच्या दरवाजानें घरांत जातो आणि त्याचवेळीं पहिल्या दरवाजानें आंत गेलेली सर्व मंडळी बाहेर येतात. )

**पांडोबा :** पहा बापू, पहा मकाजी, पहा कशी नाचतेय. कायरे बापू, तुझी मैना नाचते का अशी ?

**बापू :** मैना नाचते—पण अशी नाहीं नाचत.

**मकाजी :** तर कशी नाचते ?

**बापू :** मैना नाचते तमाशेवालीसारखी.

**पांडोबा :** अन् हा नाच आहे--

**गौरी :** ( नाचत असतांना थांबून ) तमाशेवाल्यांनीं कधीं जन्मांत सुद्धां पाहिला नसेल असा ! रागावूं नका हं बापू.

**बापू :** कशाला रागावेन ? खरोखरच कधीं हा नाच मी पाहिलेला नाहीं. कधीं पाह्यचा योग आला नाहीं, अन् यापुढं येईलसा वाटत नाहीं—अन् तो योग आला नाहीं म्हणून माझं कांहीं अडूनही राह्यलं नाहीं,—कीं मला वाईटही वाटत नाहीं त्याबद्दल. येतों बरं, चल ग मैने. ( दोघेही जातात. )

**मकाजी :** मीही येतों तर—

**पांडोबा :** थांब जरा ती टोपी कुठंय माझी ? मलाही यायचंय तुझ्या मार्केटाकडे. ( गौरी बाजूला पडलेली टोपी आणून देते. ) तुझी गाडी आहे का रे खाली गोविंदा ? जरा पोहोंचव आम्हांला मार्केटापर्यंत. भाडं द्यायचा नाहीं बरं मी.

**गोविंद :** तुम्ही द्याल खूप पण भाडं घ्यायला माझी गाडी आहे कुठं इथं ? गाडी गेलीय भाड्याला. ती यायचीच वाट पहातोंय मी.

**पांडोबा :** तोंवर बसणार आहेस का इथं ? बरं बरं, बैस. चल मकाजी, आपण खालीं जाऊन एक टॅक्सी पाहूं. ( दोघेही जातात. )

**गौरी :** मुद्दाम मागं राहिलास गोविंदा, होय ना ?

**गोविंदा :** हो.

**गौरी :** कां ?

**गोविंद :** ( गंभीरपणें ) ऐकलं तुमचं दोघींचं बोलणं.

**गौरी :** असं ?

**गोविंद :** हो. सहज कानीं आलं, एकदोन शब्द चमत्कारिक वाटले म्हणून कान दिला. ऐकावंसं वाटलं म्हणून ऐकत राहिलों. माफ कर मला.

**गौरी :** काय वाटलं तें भाषण ऐकून ?

**गोविंद :** काय वाटलं तें कांहीं सांगता यायचं नाहीं मला. मलासुद्धां अगाच कांहींतरी संशय होता. त्या संशयाला बळकटी आली तें भाषण ऐकल्यामुळं. कुंदाताई संशय बरोबर आहे.

**गौरी :** कां वाटतं असं तुला ?

**गोविंद :** तें कसं सांगूं ? एक अडाणी माणूस आहें मी गौरी. विद्या केली नाहीं मी कधीं--म्हणून आज हा गाडीवाला झालों.

**गौरी :** पण विद्वान माणसापेक्षां तूंच जास्त पैसा कमावला आहेस.

**गोविंद :** नुसता पैसा असला तरी समाजांत दर्जा मिळत नाहीं माणसाला. दर्जा असतो तो एक विद्येला किंवा कलेला. तो विद्वान आहे—तूं कलावान आहेस अन् मी एक नुसता ड्रायव्हर आहें.

**गौरी :** तूं कां बसायला पहातोस आमच्या पंक्तीला ? कां अजून गाडी हांकीत राह्यलायस ? आज शंभर माणसं आहेत तुझ्या हाताखालीं. तूं पोसतोयस त्यांना. सगळे ड्रायव्हरच आहेत तुझे—मग तूं कां गाडी हांकीत बसलायस ?

**गोविंद :** हें एक व्यसन आहे गौरी. निढळाच्या घामाचा पैसा कमवल्याशिवाय अन्न गोड लागत नाहीं मला. दुसऱ्यांनीं मिळवलेल्या पैशांवर जगायचं नाहीं मला. मी चांगला तगडा जवान आहें—कसलंही काम करायची ताकद माझ्या अंगीं आहे. काय म्हणून मी स्वस्थ बसून खाऊं ? मी पैसे मिळवतोंय. माझ्या परिस्थितीची आठवण आहे मला. माझ्यासारखे अडाणी राहिलेले जे चार तगडे जवान आहेत त्यांना मानानं पोट भरतां यावं म्हणून मी पैसे मिळवतोंय. त्यांचीं पोटं भरतायत यांतच मला मोठं समाधान आहे. मला दर्जा नाहीं, तसाच त्यांनाही दर्जा नाहीं—दर्जा नसलेल्या माणसांचं दैन्य दूर व्हावं म्हणून मी हा धंदा करतोंय. मला तुम्हा लोकांच्या पंक्तीला बसायचं नाहीं गौरी. तो विद्वान आहे, तूं कलावान आहेस—तसाच मी एक गाडीवान आहें—मजूर

आहे. तुमच्या विद्येपेक्षां आणि कलेपेक्षां या जगाला माझ्यासारख्या मजुरांचीच फार जरूर आहे. समजलीस गौरी? जातों मी.

**गौरी** : जरा थांब. अजून तुझी गाडी आलेली नाहीं.

**गोविंद** : ऐदी श्रीमंतासारखा मांडीवर मांडी चढवून बसत नसतों मी. चांगली दहा मैल रपेट मारायची ताकद आहे माझ्या टांगांत. ( तो जाऊं लागतो. )

**गौरी** : थांब. जरा थांब. आज मी कशी नाचलें गव्हर्नरसाहेबांसमोर तें दाखवतें तुला.

**गोविंद** : मी ड्रायव्हर आहें--गव्हर्नर नाहीं. ( एकदम जातो. )

**गौरी** : मग मीच नाचेन--मीच पाहीन माझा नाच—मीच कौतुक करीन माझं. नाच गौरी नाच. नाच गौरी नाच.

( हळूहळू नाचायला सुरवात करते. मधूनमधून ' नाच गौरी, नाच ' म्हणत असते. नाचाचा वेग वाढत जातो तसतशी ' नाच गौरी नाच ' हें वाक्य तितक्याच जोरानें म्हणत असते. तिचा नाच बेफाम वाढत जातो. )

--पडदा--

# अंक दुसरा

[ स्थळ : पहिल्या अंकाप्रमाणेंच, पडदा वर जातो त्यावेळीं कुंदा प्रवेश करते. ]

**कुन्दा :** ( प्रत्येक दारांतून डोकावून पहात ) कुणी नाहीं वाटतं इथं ? ( पुन्हा एकदां आंतल्या दारांत जाऊन डोकावून बाहेर येते. गंगा येते. ) कुणी नाहीं वाटतं घरांत ?

**गंगा :** हें असंच आहे आमच्याइथलं. असेल तेव्हां घर भरलेलं. नाहींतर मी एकटीच असतें या एवढ्या मोठ्या घरांत. कुणाचा कुणाला पत्ता नाहीं. कोण केव्हां येईल अन् केव्हां जाईल याचा नेमच नसतो कांहीं. मोठी तारांबळ उडते त्यामुळं माझी.

**कुन्दा :** डॉक्टर असायचे यावेळीं इथं. अन् गौरी कुठंय ?

**गंगा :** गौरी म्हणजे काय ! बागेंतलं फुलपाखरूं तें. कुठं भिरभिरत असेल कोण जाणे ! रोज भल्यामोठ्या मोटरी दाराशीं वाट पहात असतात तिची. एकेकाची चढाओढ लागलेली असते तिला घेऊन जायची. केव्हां केव्हां जेवायला सुद्धां येत नाहीं ती. तें लंच कीं काय म्हणतात ना, तिथंच होतं तिचं जेवण— अन् मला तर ती पंक्तीला नसली तर जेवण जात नाहीं. पांडुदादा तर एकेक दिवस उपाशी रहातात तिच्यापायीं. ती नसली जेवायला तर जेवीतसुद्धां नाहींत. पंग तिला कुठं आहे काय त्याचं ?

**कुन्दा :** इतकी का बेमुर्वत आहे ती ?

**गंगा :** नाहीं हो ! भारी मायाळू आहे तिचा जीव. आपल्यासाठीं पांडुदादा उपाशी राहिले असं कळलं म्हणजे रडत बसते सारखी. पण ती तरी काय करील बिचारी ? एवढ्या प्रेमानं मागसं बोलावतात त्यांना नाहीं कसं म्हणायचं ?— चहा आणूं का ? तोंवर येतील कुणी ना कुणी तरी. थांबा हं—( जाते. )

( कुंदा टेबलावरचीं पुस्तकें एकामागून एक चाळून फेंकून देऊन पुन्हां आळसावल्यासारखी कोचावर अंग टाकते. ' बाबा, बाबा, ' म्हणून हांक मारीत गोविंद येतो. यावेळीं त्याचा पोषाख साधा आहे, ड्रायव्हरचा नाहीं. )

**गोविंद :** ( कुंदेला पाहून दचकून थांबतो. ) बाबा नाहीं आले वाटतं अजून ?

**कुंदा:** गंगूताईखेरीज कुणीच नाहीं घरांत. त्या गेल्यायत माझ्यासाठीं चहा आणायला.

**गोविंद :** मग मी जातों तर. तसं कांहीं काम नव्हतं माझं. ज़रा मोकळीक मिळाली म्हणून आलों होतों— [ जायला निघतो ]

**कुंदा :** बसा ना. एकटीच बसलेंय मी इथं. डॉक्टर येईपर्यंत करा ना मला सोबत.

**गोविंद :** मी काय करणार तुम्हांला सोबत ?

**कुंदा :** असं कां म्हणतां ? माणसामाणसांत एव्हढा फरक कसला पाह्यचा ?

**गोविंद :** फरक आहेच तसा, म्हणून संकोच वाटतो माझ्यासारख्याला. तुमचं क्षेत्र वेगळं, माझं क्षेत्र वेगळं. तुम्हीं उच्च शिक्षण घेणाऱ्या तर मी एक अशिक्षित कामाठी. इंग्रजी भाषेचा गंधसुद्धां नाहीं मला. मराठी देखील धडसं येत नाहीं. तरीं नाटकं कादंबऱ्या वाचतों मी—पहातों देखील—सिनेमाला देखील जातों केव्हां केव्हां—एव्हढंच काय तें आमचं शिक्षण. पण माणसं मात्र भेटतात वेगवेगळीं. पुष्कळ पहायला मिळत, तसंच ऐकायलाही मिळतं. किती तरी गोष्टी कानावरून जातात, त्याचा परिणाम होतो मनावर.

**कुंदा :** काय परिणाम होतो ?

**गोविंद :** काय परिणाम होतो हें सांगण्याइतकी विद्वत्ता माझ्याजवळ नाहीं. एव्हढंच होतं, कीं हें असं कांहीं पाहिल्याऐकल्यामुळं मोठमोठ्या माणसांबद्दलचा आदर नाहींसा होतो मनांतून. श्रीमंतांबद्दलचा तर तिटकारा येऊं लागतो.

**कुंदा :** तुम्ही सुद्धां श्रीमंत आहां. किती आहे तुमचं उत्पन्न ?

**गोविंद :** रोज शेदीडशेंचा गल्ला येतो माझ्या पेटींत. खर्चही आहे तसाच. तरीपण मी कांहीं श्रीमंत नव्हे. मी एक मजूर आहें—जो माझ्या अंगावर रुपया आठ आणे फेंकील त्याचा नोकर आहें. मी रोज सेवा करतोंय सर्वांची म्हणूनच श्रीमंतांत मोडत नाहीं मी.

**कुंदा :** मोठे ध्येयवादी दिसतां तुम्हीं.

**गोविंद :** तें काय तें मला कळत नाहीं. माझ्या आयुष्याची सुरवात झाली ती कुणाच्या तरी घरचीं धुणींभांडी करण्यांत. त्यामुळं सेवेची आवड लागली मला. त्यानंतर बाबांनी टॅक्सी घेऊन दिली. अन् तेंच सेवेचं व्रत मी अजून तसंच चालू ठेवलंय.

**कुंदा :** अजून लग्न नाहीं केलंत तुम्ही ?
**गोविंद :** ( मोठ्यानें हंसून ) आतां करीन लग्न असंच केव्हां तरी.
**कुंदा :** तसं कुठं हेरून ठेवलंय का स्थळ ?
**गोविंद :** हेरायचं काय त्यांत ? —'अशीच कुणीतरी येईल नजरेला आणि करून टाकीन लग्न.
**कुंदा :** परवां डॅाक्टर रमेश म्हणत होते— तुम्ही घर बांधायला सुरवात केलीय म्हणे ! — असंच मोठं तीन मजली.
**गोविंद :** हो. बाबांनीच हट्ट धरला. त्यानीं एक जागा घेऊन ठेवली होती. पैसे येतायत हातीं तोंवर घर बांध म्हणाले. त्यांची आज्ञा तर मोडतां येत नाहीं !
**कुंदा :** त्या तसल्या घराला शोभेशी बायको पाहिजे — नाहीं ?
**गोविंद :** शोभेशी म्हणजे ?
**कुंदा :** शोभेशी म्हणजे — त्या घरवाल्याच्या वैभवाच्या तोलाची—तुम्ही शिकलां नसाल— पण चांगली शिकली सवरलेली—एकादी पदवीधर— माझ्यासारखी-( गोविंद मोठमोठ्यानें हंसतो. ) हंसू नका. एव्हढं मोठं वैभव असलं तर कुठलीही बी. ए. झालेली मुलगी आनंदानं माळ घालायला तयार होईल तुम्हांला.
**गोविंद :** माझ्यासारख्या कुणबटाला ?
**कुंदा :** काय हरकत आहे ? कां होतों बी. ए. आम्ही ? बी. ए. होऊन लग्न झाल्यावर इतर चार बायकांसारख्याच घर करून रहात असतों ना आम्ही ? सुखासमाधानाचं घर मिळावं म्हणूनच असतो हा एवढा उपद्व्याप. बी. ए. झालों आम्ही कीं कुणी कलेक्टर, कुणी जज् किंवा एकादा सुखवस्तु श्रीमंत नवरा मिळेल एव्हढीच अपेक्षा असते आमची.
**गोविंद :** तुम्ही कराल माझ्याशीं लग्न ?
**कुंदा :** हो ! अगदीं आनंदानं !
**गोविंद :** रमेश मुडदा पाडील माझा. अगदीं बोलायचं म्हणून हो म्हटलंत हें कळतय मला. पण खरोखरच जर मी मागणी घातली—
**कुंदा :** तेवढ्यासाठींच तर विषय काढला मी.
**गोविंद :** पण रमेशचं-तुमचं ठरलं होतं !
**कुंदा :** हो ! ठरलं होतं ! पण मला संशय येतोय त्यांचा. मी बी. ए. आहें, पण पैसेवाली नाहीं. त्यांना वाटतंय, उद्यां पांडुबाबांचं अन् त्यांचं बिनसलं—

**गोविंद** : छे : छे :

**कुंदा** : खरोखरच वाटतंय मला तसं. इथं राहणं मोठं कठीण जातंय त्यांना. लग्न करून वेगळं घर केलं तर या वैभवाला मुकावं लागेल, याचीच भीती पडलीय त्यांना. म्हणून त्यानीं एक उपाय काढलाय—( थांबते )

**गोविंद** : कुठला उपाय ?

**कुंदा** : घरच्याघरींच लग्न करून टाकायचं ! गौरीवर नजर आहे त्यांची. बाबांनीं घर सोडून जा म्हटलं तरी गौरी आहे ना चांगलीच मिळवती. हजारांनीं पैसे मिळवतेय ती.

**गोविंद** : ( अस्वस्थ होऊन ) माफ करा—मला काम आहे. ( उठून उभा रहातो. ) गेलं पाहिजे आतांच.

**कुंदा** : समजलं ! बसा खालीं. ( गोविंद बसतो. क्षणभर दोघंही स्तब्ध असतात. ) आतां असं सांगा मला—

[ बाबाना हांक मारीत गौरी प्रवेश करते ]

**गौरी** : बाबा नाहीं आले अजून ? [ दोघांकडे पाहून बिचकून ] काय झालं ?

**कुंदा** : या गौरीदेवी—

**गौरी** : अजून देवी आल्या नाहींत मला. [ गोविंद हंसतो ] हंसतोस काय ? फार बोकाळलंय हें देवीचं वेड अलीकडे. मराठमोळ्याच्या खानदानी बायकासुद्धां आपला बाईपणा टाकून देवी होऊं लागल्यायत. राग येतो मला या असल्या बायकांचा. एका काळची रस्त्यावरची भिकारीण मी. देवी म्हणून कां डिवचतां मला ?

**कुंदा** : माफ करा हं. लोकं म्हणतात म्हणून मी म्हटलं.

**गौरी** : काय चाललं होतं तुमचं ? एव्हढे लांब चेहरे करून कां बसला होतां दोघंही ?

**कुंदा** : मी मागणी घालीत होतें यांना.

**गौरी** : कसली ?

**कुंदा** : लग्नाची.

**गौरी** : याला ? या गाडीवाल्याला ? सव्वा रुपया घेऊन तुम्हांला स्टेशनावर पोंचवणाऱ्या या गाडीवाल्याशीं लग्न करणार तुम्ही ? उगीच थट्टा कशाला करतां त्या गरिबाची ? साध्याभोळ्या जीवाची अशी भुलावणी करणं शोभत नाहीं तुम्हांला कुंदाताई. खरोखरच का असं विचारलंत त्याला?

**गोविंद** : मला थट्टा वाटली ती.

**गौरी** : म्हणजे यानीं विचारलं तसं !

**कुंदा** : हो. खरोखरच मी विचारलं तसं—अगदीं मनापासून—अगदीं जिवाभावानं.

**गौरी** : मग काय उत्तर दिलं यानं ?

**कुंदा** : पळून जायला लागले.

**गौरी** : अन् तुम्ही बळेंच याला धरून बसवून ठेवलं होय ? तेव्हांच असा लांब चेहरा केला होतास होय गोंदू ?

**गोविंद** : मी जातों आतां.

**गौरी** : किती फेअर बुडेल नाहीं गेलास तर ? मी देईन तेव्हढे पैसे. आतां थांबच थोडावेळ.

**गोविंद** : हात जोडतों तुला—मी एक साधासीधा गाडीवाला आहें. तुमच्या-सारख्या विद्वान आणि कलावान माणसाशीं बोलण्याइतकी अक्कल देवानं दिली नाहीं मला. तरी बरं, कुणी प्रेमाची गोष्ट काढली नाहीं. माझ्या टॅक्सींत येणारं प्रत्येक जोडपं नेहमीं प्रेमाच्या गोष्टी बोलत असतं. कसं काय असतं हें प्रेम ? कुठं मिळतं ?

**गौरी** : बाजारांत !

**कुंदा** : नाहीं. हृदयाच्या खोल तळाला. हें प्रेम कुठून उत्पन्न होतं आणि कुठं रहातं, कितपत कुठं सामावतं, याचा कुणालाच अंदाज लागला नाहीं अजून.

**गौरी** : तुम्हांला सुद्धां ? नाहीं ? तुमच्या प्रोफेसरांना ? नाहीं ? मग कॉलेजांत प्रेम उगवतं म्हणतात तें काय ?

**कुंदा** : तें मात्र कांहीं अगदींच खोटं नाहीं. तरीपण प्रेम कांहीं कॉलेजांतच उगवत नाहीं. कॉलेजांत जायचा काल अन् प्रेमाचा उगम व्हायचा काल येतो एकाच वेळीं. पुष्कळांच्या पुष्कळच प्रकारें भेटीगांठी होतात तिथं. अन् मग पदवीच्या माळेबरोबर प्रेमाची अन् लग्नाची माळही गळ्यांत पडते तरुण-तरुणींच्या.

**गौरी** : मग आतां माझं कसं व्हायचं ! मी कांहीं कॉलेजांत गेलें नाहीं, जायचा योगही नाहीं. गेलेंच कधीं तर नाचायसाठीं. शिकायसाठीं गेल्याशिवाय प्रेम करतां यायचं नाहीं—अन् त्या हद्दीच्या तर पार होऊन गेलेंय मी. आतां कसं

ाr रे माझं गोविंदा ?

**गोविंद** : प्रेमाशीं काय करायचंय आपल्याला ? आपण नुसतं लग्नच करूं.
**गौरी** : म्हणजे तूं करणार आहेस का लग्न माझ्याशीं ?
**गोविंद** : तसं नव्हे ग—तिकडे तूं लग्न कर कुणाशीं तरी, इकडे मी लग्न करीन कुणाशीं तरी. आपण नुसतं लग्नच करूं, संसार थाटूं, पोराबाळांचा प्रपंच वाढवूं–अन् एके दिवशीं सुखासमाधानानं मरून जाऊं.
**गौरी** : नाहीं रे बाबा, तें जमायचं नाहीं मला. घरीं नवरा आला तर नाचायला यायचा नाहीं. मला अन् नाचल्याशिवाय तर मला जगतां यायचं नाहीं. बाबांनाच विचारूं काय करायचं तें. [ रमेश येतो. ] आलास ? ये. तुझीच तेव्हढी उणीव होती. तूं काय करणार आहेस ?
**रमेश** : म्हणजे ?
**गौरी** : म्हणजे तूं प्रेम करणार आहेस, कीं लग्न करणार आहेस ?
**रमेश** : त्याची उठाठेव तुला कशाला ?
**गौरी** : असं कसं म्हणतोस रे ? आधीं तुझं लग्न झाल्याशिवाय माझं लग्न कसं होईल ? मोठा भाऊ ना तूं माझा ?
**रमेश** : नाहीं. तूं कांहीं माझ्या आईच्या कुसव्याला जन्म घेतला नाहींस.
**गौरी** : पण बाबा आपली मुलगी म्हणतात ना मला ?
**रमेश** : साऱ्याच मुलींना बाबा आपल्या मुली म्हणतात अन् साऱ्याच मुलांना आपले मुलगे म्हणतात, म्हणून तीं कांहीं भाऊबहीण नाहीं होत !
**गौरी** : पण एकाच घरांत रहातों आपण.
**रमेश** : गंगूताई सुद्धां इथं असते–अन् जनी मोलकरीण–खंडू गडी, धोंडू ड्रायव्हर अन् चंदा भंगीण सुद्धां ! शिवाय ढेकूण, पिसवा, चिलटं, किडी, मुंग्या आहेतच. कुणाचं नातं नाहीं कुणाशीं. सारे पैशाचे पाईक–पैशाचे गुलाम–मोलानं विकत घेतलेले. कुणी पैशापायीं तर कुणी–
**गोविंद** : तर कुणी मायेच्या जिव्हाळ्यापायीं ! सारेच कांहीं मोलाचे मोलकरी नाहींत. समजलास रामूदादा ?
**गौरी** : थांबा रे बाबांनो. आम्हांला बोलूं सुद्धां देत नाहीं. केव्हांपासून ही कुंदाताई बोलेन बोलेन म्हणतेय पण तुम्ही लोक तोंडसुद्धां उघडूं देत नाहीं तिला. होय ना कुंदाताई ? चल गोविंद, आपण आपले आंत जाऊन भजीं खाऊं. यांना बोलूं दे इथंच. ( गोविंदाचा हात धरून त्याला ओढीत आंत घेऊन जाते. )

( रमेश या दारांतून त्या दारांत डोकावून पहातो. कुंदा स्वस्थ बसून राहिली आहे. )

**रमेश** : ( दुरून ) तूं बसणार आहेस वाटतं इथं ?

**कुन्दा** : हो.

**रमेश** : कशाला ?

**कुंदा** : तुमचं शेवटचं उत्तर हवंय मला.

**रमेश** : माझं शेवटचं उत्तर ? कशाबद्दल ?

**कुंदा** : त्याची सुद्धां आठवण नाहीं ?

**रमेश** : आठवण नाहीं असं कुठं मी म्हटलं ?

**कुंदा** : मग काय म्हटलंत ?

**रमेश** : तूंच त्या दिवशीं रागानं तणतणत बाहेर पडलीस. तीन महिने झाले त्या गोष्टीला. त्यानंतर आज येतेयस. कॉलेजांतसुद्धां भेट घेत नाहींस माझी अन् 'आठवण नाहीं का' म्हणून मलाच विचारतेस ? तुला काय वाटतं ? लोटांगणं घालीत मी तुझ्या पायाशीं यावं ? होय ? अशी काय मोठी स्वर्गीची तिलोत्तमा लागून राह्यलीयस तूं ?

**कुंदा** : नुसती तिलोत्तमाच हवीय तुम्हांला ?

**रमेश** : असं कुठं म्हटलं मी ? बायकांना अभिमान असतो तो आपल्या सौंदर्याचा—

**कुंदा** : विद्वत्तेचा नव्हे ? कर्तबगारीचा नव्हे ?

**रमेश** : बायकांना बडिवार वाटतो तो सौंदर्याचा. विद्वत्ता नी कर्तबगारी फारशा नसतात त्यांच्या हिशेबीं. एक सौंदर्य असलं, कीं कोण पर्वा करतो विद्वत्तेची अन् कर्तबगारीची ? विद्वत्तेची जरुरी भासते ती सौंदर्याची उणीव असेल तेव्हां.

**कुंदा** : मी सुंदर आहें का ?

**रमेश** : तें तूंच सांग ना !

**कुंदा** : तें मी कसं सांगूं ? मी कांहीं पुरुष नाहीं. बायकांचं सौंदर्य ठरवायचं असतं तें पुरुषांनीं. माझं रूप मला कुठं दिसतंय ?

**रमेश** : मग आरशांत पहा ना.

**कुंदा** : उलटं दिसतं आरशांत.

**रमेश** : पुरुषाच्या डोळ्याच्या बिल्लोरी आरशांत देखील स्त्रीचं रूप उलटं दिसत नसेल कशावरून ? ऐक तर. माझे डोळे मला फसवीत नसतील तर मी

म्हणेन, कीं तूं कांहीं कुरूप नाहींस. सुंदर आहेस असं सुद्धां म्हटलं असतं मी, पण तिथं मतभेद व्हायचा संभव आहे. एक प्रोफेसर या नात्यानं मी असं म्हणेन, कीं तूं विद्वान आहेस. एव्हढीशी हायस्कुलांतली पोर असतांना बेचाळीसच्या लढ्यांत तूं जो दंगा केला होतास त्यावरून असं म्हणेन, कीं तूं कर्तबगार आहेस. आज सुद्धां तूं मजुरांच्या लढ्यांत भाग घेतेयस. पण एक उणीव आहे तुझ्यांत— (थांबतो.)

**कुंदा :** कोणती ?

**रमेश :** तुला नाहीं कधीं जाणवली ती ? मोठीच उणीव आहे ती ! दीडशें रुपये पगार मिळवणाऱ्या एका कारकुनाची तूं मुलगी आहेस. मी एका लाखोपतीचा मुलगा आहें. तो माझा बाप अगदींच अशिक्षित असला तरी श्रीमंत आहे — मी विद्वान आहें. लक्ष्मी सरस्वतीची जोड आहे इथं.

**कुंदा :** अन् तुमच्या बापानं तुम्हांला घरांतून घालवून दिलं तर ?

**रमेश :** कां घालवून देईल ? मोठा प्रेमळ आहे माझा बाप. परक्याचीं पोरं सुद्धां आपलीशीं करून वाढवतोय, तो काय पोटच्या गोळ्याला घालवून देईल घरांतून ?

**कुंदा :** परक्याचीं पोरं आपलीशीं म्हणून वाढवतोय ! ळळा लागलाय मोठा तो त्या परक्यांचा, म्हणूनच घालवून देईल तुम्हांला.

**रमेश :** अशक्य नाहीं. समज, तसं कांहीं झालं—मग ?

**कुंदा :** मग तुमचा अन् माझा दर्जा सारखाच होईल.

**रमेश :** त्याचीच वाट पहातेयस तूं—होय ?

**कुंदा :** नाहीं कसं म्हणूं ? आशेला तेव्हढाच आधार आहे मला.

**रमेश :** मग सांग ना माझ्या बाबांना.

**कुंदा :** तितका परिचय नाहीं ना त्यांचा माझा.

**रमेश :** मग घे परिचय करून ! इथंच ये कीं रहायला या पागलखान्यांत. रोज मोठेमोठे फ्रूट मर्चंट भेटतील, तमासगीर भेटतील, बुरूड, चांभार, भंगीसुद्धां भेटतील इथं. एक नाची पोर तर बसलीच आहे ठाण देऊन. गाडीवाले भेटतील, रिक्शावाले भेटतील—

**पांडोबा :** (आंत येतांना) अन् वर्तमानपत्रं विकणारे फेरीवाले देखील भेटतील. (कुंदा उठून उभी रहाते.)

**रमेश :** भेटलेच की आतां.

**पांडोबा** : कां झाली आम्हां गरीब लोकांची आठवण तुम्हां मोठ्या माणसांना ?

**रमेश** : रहातोंय ना इथं ?

**पांडोबा** : मुलगा आहेस ना माझा तूं ! इंग्रजांच्याच पावलावर पाऊल देऊन वागायचं असलं तर लग्न झाल्यावर दुसरं घर करायचं असतं. आतां इंग्रजांचं राज्य नाहीं इथं. सारे म्हणतात इंग्रजांचं राज्य नाहीं म्हणून. पण मला तरी अजून इंग्रज गेलेला दिसत नाहीं.

**रमेश** : कां दिसत नाहीं ?

**पांडोबा** : मी अशिक्षित आहें ना ! तुला काय वाटतं ग पोरी, इंग्रज गेला का इथून ?

**कुंदा** : हो गेला.

**पांडोबा** : मग कशाला जातेस इंग्रजी शिकायला ! इंग्रज गेला ना ? मग **बी. ए.** कशाला व्हायला हवंय तुला ? मराठी आहे का ती पदवी ? गुजराती ? हिंदी ? तमीळ ? तेलगू ? बंगाली ? पंजाबी ? कुठल्या भाषेंतले शब्द आहेत हे ? **बी. ए.** ! इंग्रज गेला म्हणे ! शेषाच्या मस्तकापर्यंत ठाम पाय रोवून बसलाय हा इंग्रज. अजून पंधरा वर्षं तरी जात नाहीं इंग्रज इथून. इंग्रज गेला म्हणे ! अजून पंधरा वर्षं तरी तूं वागणार इंग्रजांसारखाच अन् आणखी पंधरावीस वर्षं लागतील ती इंग्रजाची पाटी पुसून टाकायला. माझ्या ह्यातींत तरी हा इंग्रज जाईलसा दिसत नाहीं. बरं बरं, काय चाललं होतं तुम्हां दोघांचं ? कां भांडत होतां अशीं ? अरे वाद घालून का लग्नं होत असतात ? चांगली धडधाकट वाढाळशी मुलगी पहावी, अंतरपाटापुढं उभी करावी, माळ घालावी अन् आपली म्हणावी. आम्ही मराठे असंच करीत आलों आहोंत. तुम्ही इंग्रजी ब्राह्मण काय करणार आहांत ?

**रमेश** : मराठी मराठ्यांना त्याची कशाला चौकशी ?

**पांडोबा** : असं होय ? मग होऊन जाऊं दे. तुला जसं कांहीं करायचं असेल तसं कर. माझी पूर्ण संमति आहे तूं जें करशील त्याला.

**रमेश** : मग जाऊं मी आतां ?

**कुंदा** : थांबा.

**पांडोबा** : अग मी कुठं त्याला जाऊं देतोंय ? अजून पुष्कळ बोलायचं आहे मला

**रमेश** : काय बोलायचंय ?

**कुंदा** : आधीं मला बोलायचंय ?

**पांडोबा** : काय बोलायचंय तुला ?

**कुंदा** : सून म्हणून मला घरांत घ्यायची तयारी आहे तुमची ?

**पांडोबा** : कां असूं नये ? चांगली याच्याचसारखी शिकलीसवरलेली आहेस. खुशाल ये कीं इथं. दोघंही बोला इंग्रजी भाषेंत. मग कांहींसुद्धां समजायचं नाहीं मला.

**रमेश** : मग जाऊं मी आतां ?

**पांडोबा** : म्हणजे हें ठरलं तर !

**रमेश** : मुळींच नाहीं. [ एकदम घरांत जातो. ]

**पांडोबा** : काय झालंय याला ? काय ग, असं कां म्हणाला तो ?

**कुंदा** : तेंच तर मला कळत नाहीं !

**पांडोबा** : मग कशाला विचारलंस तसं मला ?

**गौरी** : मी नुसता अंदाज घेतला–अजून त्यांच्या मनाचा निश्चय झालेला दिसत नाहीं.

**पांडोबा** : हें तुमचं इंग्रजी शास्त्र वाटतं ? अशा विचार करीत बसायच्या गोष्टी नव्हेत या. चांगलीं वर्षंचीं वर्षं विचार करतात, मग लग्न करतात अन् शेवटीं पहावं तर काडीमोड ! मग आधीं विचार करण्यासाठीं वर्षं घालवतात कशाला ? त्यापेक्षां मला वाटतं—

**गौरी** : [ आंतून ओरडत येत ] बा ऽ बा ऽऽ, मी भजीं खाल्लीं आतां—इतकीं इतकीं. [ गोविंद येतो ] अन् यानं पण. कांहींसुद्धां शिल्लक ठेवलीं नाहींत. तुमची मंडळी आली, कीं उपास पडणार त्यांना.

**पांडोबा** : कांहीं नाहीं उपास पडायचा. तशी माझी गंगा चांगली खबीर आहे. हिला नाहीं बोलावलंस भजीं खायला ?

**गौरी** : ती बसली होती इथं बोलत. कुठं गेला रमेश ?

**पांडोबा** : हिनं देखील भजीं खाल्लीं वाटतं इथं ! म्हणूनच तो गेला वाटतं निघून.

**गोविंद** : मी जाऊं का आतां ?

**पांडोबा** : कुणीं बोलावला होता तुला ? आपण होऊन आलास, भजीं खाल्लींस अन् आतां जाऊं का म्हणून विचारतोस ? कसली घाई आहे एव्हढी ?

**गोविंद** : तशी घाई नाहीं कांहीं—

**पांडोबा :** मग बैस तर तिथं. तो मकाजी नाहीं आला अजून ? अन् बापू मांग सुद्धां मुद्दाम येणार आहे आज. काल तो तुझा नाच पहायला गेला होता विद्यामंदिरांत.

**गौरी :** होय ? मग मला नाहीं कुठं भेटले ते ?

**गोविंद :** अशा वेळीं तुला भेटणं सोपं का असतं ? मोठमोठे लोक घेरून बसलेले असतात तुला, तिथं बिचाऱ्या बापू मांगाला कोण वाट करून देणार ?

**कुंदा :** मी जाऊं आतां ?

**पांडोबा :** अग बैस ना. कसली घाई आलीय एव्हढी ? आतां परीक्षा होऊन गेलीय तुझी. अभ्यासाचा लकडा देखील नाहीं मागं

**कुंदा :** तुमच्या या इथल्या चर्चेत कांहीं कळत नाहीं मला.

**पांडोबा :** असं कसं होईल ? एव्हढी शिकलेली तूं, आम्हां अडाणी माणसांची भाषासुद्धां नाहीं कळत तुला ? त्यापेक्षां खरंखरंच सांग ना—कीं असली अडाणी भाषा आवडत नाहीं आपल्याला म्हणून ! बोल ना. मुकाट कां राहिलीस ?

**कुंदा :** मोठं कठीण जातंय हें मला. काय झालंय तेंच समजत नाहीं. कसं बावरून गेलंय मन.

**पांडोबा :** हें असं व्हायचंच. आतां असं कर, त्या तिथं त्या खुर्चीवर बैस आणि माझा हा सारा गोतावळा जमून निघून जाईपर्यंत स्तब्ध बसून ऐक. तें सारं कांहीं ऐकून झालं तुझं, म्हणजे माझ्या अडाणी पद्धतीप्रमाणं मी परीक्षा घेणार आहें तुझी. ( मकाजी येतो ) हा पहा आला पहिला सभासद. केव्हांही झालं तरी सर्वांच्या आधीं येतो हा. आज सर्वांना राहवून घेणार आहें मी. आज गौरीच्या नाचाचा प्रोग्राम व्हायचाय इथं.

**गौरी :** होय बाबा ? मग आधीं कां नाहीं सांगितलंत मला ?

**पांडोबा :** आधीं केव्हां सांगायचं ? हा आत्तांच तर आलों ना मी ! त्या बापू मांगाला चीत मारायचाय मला.

[एक गृहस्थ बिचकत बिचकत आंत येऊं लागतो. गोविंदाची त्याच्याकडे नजर जाते.]

**गोविंद :** ( त्या गृहस्थाला ) कोण पाहिजेय तुम्हांला ?

[सर्वांची नजर त्याच्याकडे जाते अर्थात् पांडोबा मागें वळून त्याच्याकडे पहातात. त्यांना पहातांच त्याचा चेहरा खुलतो. ]

**गृहस्थ** : आहेतच हे इथं. आपल्याला भेटायचंय मला.

**पांडोबा** : मग भेटा की.

**गृहस्थ** : जरा एकांतांत भेटायचंय मला. मला ओळखलं नाहीं ?

**पांडोबा** : ओळखलं तर ! तशी तुमची आमची गांठ पडत नाहीं रोज, पण तुमचा फोरमन भेटतो ना रोज पहाटे. तरीपण मी ओळखतों तुम्हांला.

**गृहस्थ** : थोडं खाजगी काम आहे माझं—जरा एकांत पाहिजे मला बोलायला.

**पांडोबा** : इथं एकांत बिकांत कांहीं नाहीं. मी आलों इथं, कीं आकांत ! सारा गोतावळा जमतो माझा.

**गृहस्थ** : जरा तुमच्या खाजगी खोलींत बसूं आपण क्षणभर.

**पांडोबा** : माझ्याकडे खाजगी बिजगी कांहीं नाहीं. माझीं माणसं टाकून आपण एका बाजूला जाऊन बोलणं मला आवडत नाहीं. तुम्ही खाजगी म्हणून जरी माझ्याशीं कांहीं बोललांत तरी पुन्हां आल्याबरोबर मी सारं कांहीं सांगून टाकीन यांना तुमच्यासमोर. या, बसा इथं अन् काय बोलायचं तें मोकळ्या मनानं बोला.

**गृहस्थ** : मला जरा संकोच वाटतो बोलायला. विषय जरा नाजुक आहे. षट्कर्णी होतां कामा नये.

**पांडोबा** : माझ्याकडे बोलतांत कीं नुसता षट्कर्णींच काय, सासष्ठकर्णी व्हायचा तो विषय. इथं माझ्याकडे आंतबाहेर कांहींच नाहीं.

**गृहस्थ** : मोठा पेंच आलाय. कसं करायचं आतां !

**पांडोबा** : काय होईल तें होईल, आतां बोलून टाकाच.

**गृहस्थ** : मला ओळखतांच तुम्ही—होय ना ? तें असं झालंय—कसं सांगूं आतां ? पहिल्यापासून तुमचा ‘ नवा जमाना ’ पत्राकडे ओढा —

**पांडोबा** : त्यानींच तर मला पहिल्यानं अन्न दिलं !

**गृहस्थ** : तें खरं आहे—पण आतां आमचं हें ‘ नवी जाणीव ’ पत्र सुरू झालं आहे—मी तरी पूर्वी ‘ नवा जमाना ’ पत्रांतच होतों ना ? आतां हें आमचं पत्र जसं चालावं तसं चालत नाहीं. किती झकास निघतंय, पाहिलंत ना ? कां होतंय हें असं ?

**पांडोबा** : तें मी काय सांगूं ? लोकांना आवडतं तें ते घेतात.

**गृहस्थ** : असंच कांहीं नाहीं. लोकांना आमचं पत्र आवडतं. पण तें

लोकांपर्यंत जाऊन पोंचतच नाहीं. पूर्वी 'नगर भवानी' पत्र निघालं होतं--तें तुम्ही पाडलं.

**पांडोबा :** मी पाडलं ?

**गृहस्थ :** तुमच्या हातांत सारं कांहीं आहे. दिलंच नाहीं विक्रीला-

**पांडोबा :** मी अशीं पत्रं दडपतों असं का तुमचं म्हणणं आहे ?

**गृहस्थ :** असं मी नाहीं म्हणत—लोक म्हणतात.—'नवा जमाना' पत्राला जो जो विरोध करील त्याचं त्याचं पत्र तुम्ही पाडतां असा दावा आहे सर्वांचा. 'दुंदुभी' असंच पडलं. 'धुरीण' असंच पडलं—

**पांडोबा :** तुमचा विश्वास नसेल माझ्यावर तर दुसरा कुणी न्यूज एजंट उभा करा.

**गृहस्थ :** तेंही केलं होतं ना दुंदुभीनं—पण तो न्यूजएजंटच खलास झाला. त्यालाही तुम्हीच पाडला म्हणतात.

**पांडोबा :** इंग्रजांना देखील मीच घालवून दिलं म्हणून नाहीं का म्हणत ?

**गृहस्थ :** (हंसायचा प्रयत्न करीत) तसं देखील म्हणतील. सत्ता आहे ना तुमच्या हातीं ?

**पांडोबा :** पण लेखणी आहे तुमच्या हातीं. तरवार आहे ती. तुकडे करून टाका कीं माझे त्या लेखणीनं.

**गृहस्थ :** तसं करायला गेलों तर आम्हीच होऊं भुईसपाट.

**पांडोबा :** मग तुमची ताकद ती कसली ? राज्यंच्या राज्यं उलथून घालतां तुम्ही—विद्वान आहांत तुम्ही-राजकारणाचे आडाखे जाणतां तुम्ही—मोठमोठ्या मुत्सद्यांच्या चुका दाखवून देतां तुम्ही-या पक्षाची त्या पक्षावर मात कशी करावी त्याचे जबरदस्त डाव टाकतां तुम्ही-असली कर्तुम्अकर्तुम् अन्यथा कर्तुम् शक्ति असलेले तुम्ही संपादक माझ्यासारख्या मजुराला भीतां ? एका फेरीवाल्याला भीतां ?

**गृहस्थ :** तसं नव्हे—आमचं असं म्हणणं आहे, कीं आमचं हें वर्तमानपत्र तुम्ही जरा उठवून द्या. मनांत आणाल तर तुम्हांला कांहीं अशक्य नाहीं. आमचे मालक तुम्हांला खूष करायला तयार आहेत. नुसता आकडा सांगा, कोरा चेक सही करून दिलाय त्यानीं माझ्याकडे—

**पांडोबा :** चालते व्हा इथून. लाज नाहीं वाटत ? .एम्. ए. एल्. एल्. बी. होऊन हेंच का शिकलांत ? आगरकर, टिळक, खाडिलकरांच्या खुर्चीवर बसलां- हांत याची आठवण आहे का तुम्हांला ? कशाला भ्रष्ट करतां ती खुर्ची ?

रोज वर्तमानपत्रांतून लांचलुचपतीविरूद्ध ओरड करणारे तुम्ही-तुम्ही लांच देऊं करतां मला? मला? एका मजुराला? पोस्टांतला पोस्ट-मन होतों मी एका काळीं-संपांत माझी ही नोकरी गेली. तशीं पत्रं वाटीत होतों चार चार जिने चढून, आतां वर्तमानपत्र वाटूं लागलोंय. तेव्हां दाराशीं जात होतों प्रत्येकाच्या पत्र देण्यासाठीं, आतां प्रत्येकजण धांवतोय माझ्यामागं वर्तमानपत्र घेण्यासाठीं. त्या माझ्या गिऱ्हाइकांचा पाईक आहें मी. तुमचा नव्हे! समजलं? व्हा चालते इथून. गोविंदा, धर याच्या बखोटीला आणि काढ याला बाहेर. लांच देऊं पहातो मला! जगांतली लांचलुचपत हा नाहींशी करणार! पहातोस काय? काढ त्याला बाहेर! [ गृहस्थ पळत जातो. ] पाहिलंस कुंदे? हे आमचे विद्वान! पैसेवाल्यांच्या ताटाखालचीं मांजरं होऊन बसलेयत. तूं बी. ए. होणार आहेस ती एव्हढ्यासाठींच का? अन् तो माझा मुलगा? तो हवा होता यावेळीं ही गंमत पहायला. अशी चीड येते या लोकांची! या असल्या विद्वानां-पेक्षां डोक्यावर पाटी घेऊन फळं विकणारा हा मकाजी, टॅक्सी हांकणारा हा गोविंदा, अन् डफतुणतुणं घेऊन गरीबगुरीबांना रिझवणारा तो बापू मांग हे कां कमी वाटतात तुम्हांला? इंग्रजी शिकलों नाहीं आम्ही म्हणून? तुमच्या विद्वत्तेच्या मिजासीपेक्षां आमची अंगमेहनतीची मिजास मोठी मोलाची वाटते आम्हांला.

**कुंदा** : [ पुटपुटत ] डिग्निटी ऑफ लेबर!

**पांडोबा** : काय म्हणालीस?

**कुंदा** : डिग्निटी ऑफ लेबर—अंगमेहनतीचं वैभव.

**पांडोबा** : हो—वैभवच! हें वैभव आहे आम्हां मजूर लोकांचं. या मजुरीच्या वैभवापुढं तुमच्या साऱ्या युनिव्हर्सिटीच्या पदव्या म्हणजे धूळमातीसारख्या वाटतात मला. केव्हढा आनंद असतो या अंगमेहनतींत! अरे अंग मोडून राबलांत तर लक्ष्मी पायाशीं लोळेल तुमच्या; तिथं कसला तुमच्या पदव्यांचा बडिवार! जाऊं दे.

**गौरी** : बापू कसे नाहीं आले अजून?

**पांडोबा** : बापू राहूं दे सध्यां. कशाला तान्हेली आहेस एव्हढी बापूसाठीं?

**गौरी** : माझा नाच पहायला आले होते काल ते.

**पांडोबा** : असं होय! त्याच्या शिफारसपत्रासाठीं वाट पहातेयस होय त्याची? निराशा होईल तुझी. [ गौरी हंसते ] हंसतेस काय? आपल्या कलेचा मोठा अभिमान आहे तुला. तुला कां अभिमान वाटतो त्या कलेचा?

**गौरी :** तें कसं सांगतां येईल मला ?

**मकाजी :** वर्तमानपत्रांत येते ना तारीफ हिची ? बापू मांगाच्या तमाशाची खबर कुठं येतेय वर्तमानपत्रांत ?

**गोविंद :** केव्हढे मोठमोठे लोक येतात पहायला ! तोंड फाटेपर्यंत तारीफ करीत असतात.

**पांडोबा :** वर्ततमानपत्रांतली शिफारस वाचूनच ना ?

**गोविंद :** वा ! वा ! म्हणजे त्यांना कांहीं कळतच नाहीं की काय ? हिचा शो संपला, कीं मी जेव्हां पोंचवतों एकेकांना, तेव्हां असे बोलत असतात आपापसांत —माझं ऊर भरून येतं तें ऐकतांना. ( बापू मांग येतो ) हे बघा बापूच आले.

**बापू :** ( आंत येत ) काय विचारणार आहांत मला ?

**गौरी :** [ त्याचा हात धरून त्याला आणून बसवीत ] सारखी वाट पहातेंय मी तुमची. हे आले, ते आले-सारखे बडबडत होते बाबा देखील—पण कांहीं येत नव्हतं कानीं माझ्या. सारखे डोळे लागले होते माझे तुमच्या वाटेकडे—

**बापू :** असं काय विचारायचं होतं मला ?

**गौरी :** काल तुम्ही आलां होतां ?

**बापू :** कुणीकडे ?

**गौरी :** विद्यामंदिरांत—माझा शो पहायला.

**बापू :** हो. आलों होतों. मोठं कठीण गेलं मला आंत जायला. ही रीघ लागली होती मोटरींची. कसाबसा तिकीट ऑफिसापर्यंत गेलों. पहातों तों शेवटचा दर पांच रुपये. आम्हांला संवय चार आठ आण्याची. म्हटलं, आतां काय करायचं ! इच्छा होती अगदीं पुढं बसून पाह्यची. सुदैवानं पैसे होते खिशांत—

**पांडोबा :** मग किती रुपयांचं तिकीट काढलंस ?

**बापू :** पंधरा रुपयाचं. पाह्यचं होतं ना मला नीटपणें ?

**गौरी :** आतां सांगा, काय वाटलं तुम्हाला ?

**बापू :** मोठं दुःख झालं मला ! [ गौरी त्याच्या खांद्यावरचे दोन्ही हात काढून दचकून मागें सरते. ]

**गौरी :** इतका का वाईट वाटला माझा नाच ?

**बापू :** नाहीं ग पोरी, भारीच सुंदर नाचलीस तूं. सारखं उर भरून येत होतं माझं.

**गौरी :** मग दुःख कां वाटलं तुम्हांला ?

**बापू** : म्हणूनच दुःख वाटलं. इतकी सुंदर नाचत होतीस, पण त्याचं चीज केलं नाहीं कुणी.

**गौरी** : चीज केलं नाहीं ?

**बापू** : हो. कांहीं सुद्धा चीज केलं नाहीं कुणी. एक सुद्धां चवली उडवली नाहीं कुणी. आरडाओरडा तर नाहींच केला. मुडद्यासारखे बसले होते सारे. नाच संपला कीं टाळ्या देत होते. कांहीं जीव नव्हता त्या टाळींत. आपली टाळी द्यायची म्हणून देत होते. एकानं दिली, दुसऱ्यानं दिली, कीं लागले सारे टाळी द्यायला. एव्हढं सुद्धां काळीज नव्हतं त्या टाळींत—

**पांडोबा** : अगदीं बरोबर. मी पाहिलंय तें. मलासुद्धां असंच वाटे केव्हां केव्हां.

**बापू** : कसला होता तो नाच ? काय चाललं होतं तें ? कुणीसुद्धां बोलत नव्हता एक शब्द. आंतून कुणी गात होतं वाटतं गाणं—पण तें बंगाली होतं वाटतं—कुणीसं म्हणाला असं.

**गौरी** : हो. बंगालीच होतं तें गाणं. गुरुदेव टागोरांनी लिहिलेली एक कथा होती ती. त्यांतलं होतं तें गाणं.

**बापू** : मला कांहीं सुद्धां समजलं नाहीं त्यांत. शेजारच्या एका माणसाला विचारलं, पण त्यालासुद्धां कांहीं समजत नव्हतं त्यांतलं—तरी देखील टाळी देतच होता लेकाचा. अक्कलशून्य मूर्खांचा बाजार दिसला सगळा.

[ गौरी खिन्नपणें हळूहळू बसते. ]

**बापू** : मोठमोठे शेठिये आले होते—विद्वान देखील आले असतील कदाचित. तालसुद्धां कळत नव्हता कुणाला. भलत्याच जागीं देत होते समेची टाळी. उगीच माना हालवीत होते. असं वाटलं, एकेकाच्या थोबाडींत द्यावी अन् नीघ इथून म्हणून म्हणावं. मला नुसता नाच दिसत होता तुझा. चंद्राच्या चांदणीसारखी तूं शोभत होतीस त्या काजव्यांच्या मेळाव्यांत. असा खुलत होता तुझा चेहरा—केव्हां राग, केव्हां लोभ तर केव्हां आसवं पाझरत होतीं डोळ्यांतून तुझ्या ! हात म्हणजे जसे कांहीं कमळाचे देंठ—नुसते लवलवत होते वाऱ्याच्या झुळुकीनं. अन् तुझ्या पावलटीवरून तर जीव कुरंवडून टाकावा असं वाटलं. कशाला ग पोरी नाचतेस असल्या मूर्खांपुढं ? एकाचं सुद्धां हृदय उचंबळत नव्हतं. थरथरलं पाहिजे, भिरभिरलं पाहिजे, दंगा करून थिएटर नुसतं डोक्यावर घेतलं पाहिजे. तेव्हां कुठं खरं समाधान वाटेल नाचासाठीं अंग मोडणाराला !

**कुंदा** : इतका का अजब होता तो नाच ?

**बापू** : होय ग बाई, अजबच होता तो देखावा. पण त्यांत कथा म्हणून काय जर असेल तर ती मात्र मला कळली नाहीं. मी नुसता नाच पहात होतों. एकटा मी होतों तिथला खराखुरा प्रेक्षक. बाकी मुडदे होते सारे. एकाचं सुद्धां काळीज हललं नसेल. त्यांच्या त्या टाळ्यांची चीड येत होती मला. खोटं ढोंग सारं ! कशाला ग पोरी नाचतेस अशा जागीं ?

**गौरी** : तर कुठं नाचूं !

**पांडोबा** : ( डोळे पुसून ) आतां कांहीं बोलूं नका कुणी. कांहीं सांगूं नका. चला, आपलीं भजीं थंड झालीं असतील तिकडे. चला उठा. (उठून जाऊं लागतो.) चला, उठा म्हणतों ना. (सर्व जातात. गोविंदा सर्वांच्या मागें असतो. त्याला गौरी थांबवून धरते. )

**गौरी** : आतां तूं कशाला जातोयस ? काय खायचं तें खाऊन झालंयच की आपलं.

**गोविंद** : पण बाबा काय म्हणतील ?

**गौरी** : गंगूताई सांगेल त्यांना. इकडे ये. बैस इथं. ( गोविंद बसतो. ) आतां सांग मला, बापू म्हणाले त्याचं काय वाटतं तुला ?

**गोविंद** : अगदीं शद्वानूशद्व खरा वाटला मला. पुष्कळ वेळ पाहिलेयत मी तुझे नाच. अगदीं भक्तिभावानं पहात असें मी. ते देखावे—ते झगझगीत पोषाख—ते चकाकणारे दागिने—ते मागले अजब पडदे, ते प्रकाशाचे रंगीबेरंगी झोत— असं वाटे, सारं कांहीं तोडून फेकून द्यावं अन् एक झुळझुळीतशी तलम साडी नेसवून तुला एकटीला तेव्हढं नाचायला लावावं. कशाला तें अवडंबर ? तुझे ते कबुतरासारखे पाय झुळझुळूं लागले कीं वाटे, पायींचा पैंजण होऊन रहावं तुझ्या—

**गौरी** : चल. वेडा कुठला. भलतंच कांहींतरी बोलूं नये.

**गोविंद** : नाहीं ग गौरी, दिलाला वाटलं तें बोललों. तुझी तारीफ करीत नाहीं मी. तुझी तारीफ करतात त्यांची चीड येते मला. माणसाच्या वाचेंतल्या कोरड्या शद्बांनीं का सांगतां येईल तो आनंद ? तें काय आहे तें जाणवलं पाहिजे या इथ. ( छातीला हात लावतो. ) बोलून नाहीं दाखवतां यायचं तें. बापू बोलला, अन् आतां तूं विचारलंस म्हणून मला वाचा फुटली. कधीं शद्ब तरी काढला होता का मी आजवर या बाबतींत ? फुकट, फुकट अगदीं कावळ्यापुढं रत्न टाकतेयस ग गौरी !

**गौरी** : मग काय करूं तर? आज नवी दृष्टी आली मला. आजवर स्वतःला फसवून घेत होतें. कितीजण येत होते, मारे जीव तोडतोडून बोलत होते—पण आजची बापूंची भाषा एकाच्या सुद्धां तोंडून आली नव्हती कधीं. आज पहिला दर्दी भेटला मला. नुसता दर्दी नव्हे—गुरू भेटला मला. त्या या माझ्या नव्या गुरूकडूनच मागोवा घेत मी जाणार आहें आतां पुढं.

**गोविंद** : अगदीं बरोबर!

**गौरी** : वेड लागेलसं वाटलं तो एकेक शब्द ऐकतांना. आंतून आनंदाच्या गुदगुल्या होत होत्या, तर इकडे फटके झोंबत होते रोमारोमांतून. तिळातिळा-एवढे तुकडे पडत होते काळजाचे. मागं पहात होतें मी—पुढली नजर मागं वळवून मागं पहात होतें—नवी नजर आली होती ना मला! त्या नव्या नजरेनं मी पाहूं लागलें तेव्हां त्या माझ्या स्तुतिपाठकांचं नागडंउघडं स्वरूप दिसून आलं मला. ढोंग! ढोंग! ढोंग! सारं ढोंग! माझ्या स्तुतीपेक्षां स्वतःचीच तारीफ होती ती त्यांची. आम्ही मोठे, आम्ही श्रीमंत, आम्ही कलेचे प्रेमी, आम्हीच तेव्हढे कलेची कदर करणारे—तूं एक कीडमुंगी नाचतेस आमच्या-समोर—आम्ही आहों म्हणून तुझी कला—आम्ही आहों म्हणून तुझं कौतुक—आम्ही आहों म्हणून तूं आहेस—आम्हीं करतों म्हणून तुझी किंमत—आम्ही डोळे मिटले तर तूं कवडीमोल—आम्ही म्हणतों म्हणून तूं हिरकणी–नाहींतर तूं वाळवंटांतली गारगोटी आहेस, असंच ते जणूं सांगत होते मला. बापूंनी दाखवून दिलं म्हणून दिसलं. काय करूं? कुठं जाऊं? कुणासमोर नाचूं? कुठं सांपडेल मला खऱ्या कलेचं खरं प्रेम?

[उमाळा येउन कोचावर अंग टाकते. गोविंद तसाच ताठरून स्तब्ध बसला आहे. पलीकडल्या दारांतून रमेश येतो.]

**रमेश** : गेली वाटतं ही भुतावळ?

**गौरी** : (ताडकन उठून) कुणाला म्हणतोत भुतावळ?

**रमेश** : हे, आत्तां जमले होते ते.

**गौरी** : भुतावळ नव्हती ती—अस्सल जातिवंत देवाघरचीं माणसं आहेत तीं. त्यांना भुतावळ म्हटलंस तर किडे पडतील तुझ्या तोंडांत.

**रमेश** : (मोठमोठ्यानें हंसून) कुठल्या नाटकांतलं भाषण हें?

**गौरी** : या जगाच्या नाटकांतलं—विधात्यानं लिहिलेल्या अन् तुम्ही आम्ही करून दाखवीत असलेल्या नाटकांतलं आहे हें भाषण. वाचून पाठ केलेलं भाषण

नव्हे हें. असंच उगवलं आहे हें भाषण—वाळवंटांतल्या तुरळक हिरवळीसारखं—मृगजळाच्या लहरीसारखं—आपसुक पेटलेल्या ज्वालामुखीसारखं. चटका लागला नाहीं त्याचा तुला ?

**रमेश** : इतकी कोवळी कातडी नाहीं माझी. चांगलाच मुर्दाड बनलोंय मी तुम्हा लोकांच्या सहवासांत. या साऱ्या भुतावळीच्या वाळवंटांत उगवलेल्या तुरळक हिरवळीसारखाच—कोमेजून जातोंय मी तुम्हां लोकांच्या संगतींत. मातीमोल होऊन जातेय माझी विद्वत्ता इथं.

**गोविंद** : तुझी विद्वत्ता ? कसली रे तुझी विद्वत्ता ? चार इंग्रजी शब्द शिकलास, कुठल्या तरी चार इंग्रजाचे परके शब्द पोपटासारखे पढलास, ती तुझी पोपटपंची ऐकून तुझ्यासारखेच आणखी चारजण तुझं कौतुक करूं लागले—इंग्रजांची राजवट होती म्हणून तूं विद्वान ठरलास—आतां आमची राजवट आहे. तुझ्या विद्वत्तेची कसोटी लागायची आहे ती यानंतर. ज्ञानोबारायांचा महाराष्ट्र माहीत आहे तुला ? तुकोबारायाचा महाराष्ट्र तूं ओळखतोस ? आगरकर टिळकांच्या महाराष्ट्राची आठवण तरी आहे का तुला ? इंग्रजीला पोतडींत घालून मराठी भाषेची पताका फडकवणाऱ्या अण्णा कर्व्यांची कधीं आठवण झालीय तुला ? नव्वद वर्षं उलटून गेलेला म्हातारा—या, माझ्या गाडींत बसा म्हटलं, तर पायी चालत जाईन म्हणतो—अजून हिंडतोय दारोदार मागसाच्या जातीच्या समतेसाठीं—तसल्या विद्वत्तेची ओळख आहे का तुला ? आम्हीं भुतं होय ? होय—भुतंच आहों आम्ही तुमच्यासारख्या तकलुपी विद्वानांची रेवडी उडवणारीं भुतं आहों आम्ही. हीं तुझ्यासारखीं माणसंच नाश करतील या स्वतंत्र झालेल्या आमच्या देशाचा—

[ हें सारें भाषण चाललें असतांना कुंदा आंतल्या दारांत उभी राहून ऐकत असते. ती एकदम पुढें येते. ]

**कुंदा** : कृपा करून जाल का इथून डॉक्टर ?

**रमेश** : तूं मला इथून जायला सांगतेस ? माझ्यामुळं या घरांत पाऊल पडलेली तूं—ती तूं मला माझ्या घरांतून निघून जायला सांगतेस ?

**गौरी** : मी सांगतें तुला निघून जायला.

**रमेश** : तूं तरी कोण ? रस्त्यावरची एक भिकारीण. वळचणीला वळवळत पडलेल्या कुत्र्याचं गोंडस पिल्लं दिसावं अन् त्याला घरीं आणून बाळगावं, आपलं म्हणावं, मांडीवर घेऊन खेळवावं—तसं बाबांनी लाडावलेलं कुलंगी कुत्रं तूं—

**पांडोबा** : ( आंतून ) रमेश ! ! ( बाहेर येतो. ) चालता हो इथून. एक क्षणभरसुद्धां राहूं नकोस माझ्या नजरेसमोर. ( मकाजी, बापू आंतून बाहेर येतात. )

**रमेश** : ही-हीच-हीच ती सारी भुतावळ. अडाणी, जंगली, अक्षरशत्रू हमाल !—

**पांडोबा** : तुझा बापसुद्धां.

**रमेश** : हो, हो—माझा बापसुद्धां.

**पांडोबा** : चालता हो इथून.

**रमेश** : मला तरी कुठं इथं रायला हवंय ! ( जातो. )

**गौरी** : उचला हें सामान—या सारं बाजूला ठेवून. पहातोस काय गोविंद, उचल या खुर्च्या.

**गोविंद** : कशाला ?

**गौरी** : विचारूं नकोस—कामाला लाग. या कुंदाताई, उचला ही खुर्ची. अन् या बापू, हात लावा या कोचाला. अन् मकाजीबुवा, तुम्ही सुद्धां उचला तें टेबल.

**पांडोबा** : कसली गडबड चालवलीयस ही गौरी ?

**गौरी** : आधीं हें सामान उचलून जागा मोकळी करा, मग सांगतें. अवसान आलंय आज मला. वारं भरलंय माझ्या अंगांत. आज खूष करून टाकणार आहें सर्वांना. बसा आतां इथं. आतां मालवा ते सारे दिवे. हं, हं. एक मधला तेव्हडा राहूं दे. आतां पहा.—

[ गौरी नाचूं लागते. जीव तोडून नाचूं लागते. तिचें नाचणें अत्यंत बेफाम होतें. त्या बेफामपणाची कमाल झाल्यामुळें शेवटीं ती मूर्च्छा येऊन खालीं पडते. कुंदा तिला सावरून धरते. सारे धांवतच जवळ येतात ]

— पडदा —

# अंक तिसरा

[ स्थळ: पहिल्या आणि दुसऱ्या अंकाप्रमाणेंच. आतां दिवाणखान्यांतील सामानसुमान पूर्वीप्रमाणें व्यवस्थित रीतीनं लावलेलें आहे. पडदा वर जातो त्यावेळीं गंगू अस्वस्थपणानें पुन्हां पुन्हां दारांतून डोकावून पहात असलेली दिसते, इतक्यांत गौरी येते. ]

**गंगू :** आलीस ? काल रात्रीं गेलीस—अजून तुझा पत्ता नव्हता—पांडूबाबा जेवलेसुद्धां नाहींत आज. चहा घेऊन गेले नाक्यावर तर चहासुद्धां घेतला नाहीं त्यांनीं. होतीस कुठं ?

**गौरी :** ( गंभीरपणें ) आजच कांहीं असा उशीर झाला नाहीं मला !

**गंगू :** नाहीं कसं ? तुला उशीर होतो—नाहीं असं नाहीं-पण सकाळीं येतेस. जेवणाची वेळ सुद्धां उलटून गेली-अशी एव्हढा वेळ कधीं बाहेर राहिली होतीस ?

**गौरी :** बापूकडे राहिलें होतें.

**गंगू :** बापूकडे ? बापू मांगाकडे ?

**गौरी :** मांग ! कोण म्हणेल त्याला मांग ! ब्राम्हणापेक्षां ब्राम्हण आहे तो. ( एकदम कोचावर बसते. तिला गंहिवर आला आहे हें पाहून गंगू घाबरून तिच्याजवळ बसते. )

**गंगू :** काय झालं ग असं तिथं ?

**गौरी :** असं म्हणजे कसं ?

**गंगू :** अगदीं गळगळीत झालीयस—कुणी कांहीं बोललं का तुला तिथं ?

**गौरी :** सारीच बोलत होतों आम्हीं -बापू, मैना, नैना त्यांचा तो हलगीवाला राबू, ढोलकीवाला सदू, अन् तो सोंगाड्या जगन्नाथ—सारी बोलत होतों आम्हीं —अगदीं पहाटेपर्यंत बोलत होतों. उशीरा झोंपलों, त्यामुळं उठायला उशीर झाला, तेव्हां बापूची बायको म्हणाली—

**गंगू :** कीं जेवून जा म्हणून ! अन् तूं जेवायला राह्यलीस तिथं ?—बापू मांगाच्या घरीं ?

**गौरी :** हरिजन आहेत ते. मांग म्हणायचं नाहीं त्यांना आतां. माहित आहे ? कायदा झालाय तसा ! अन् किती सुंदर जेवण केलं होतं त्यांनीं ! कांहीं फरक

वाटला नाहीं मला ! अगदीं इथं घरींच जेवतेंय असं वाटलं. उगीच हे भेदाभेद केलेयत कुणीं !

**गंगू** : तूं कांहीं म्हण, पण आपल्याला तें कांहीं पटत नाहीं. कसंसंच वाटतं मनाला. आधीं असं सांग, तिथं कांहीं विशेष झालं का ?

**गौरी** : नाहीं ! कां असं वाटलं तुला ?

**गंगू** : सांगायचं नसलं तर सांगू नको—पण खास कांहींतरी झालंय. तुझा चेहराच सांगतोय.

**गौरी** : आरसा आण पाहूं. पाहूं दे माझा चेहरा मला.

**गंगू** : थट्टेवर नेऊं नकोस. मी म्हटलं ना तुला, सांगायचं नसलं तर सांगू नकोस. मला फसवणं सोपं नाहीं तितकं. तिथं कुणी अपमान केला का तुझा ?

**गौरी** : माझा अपमान करायला ते विद्वान नाहींत कीं श्रीमानही नाहींत. गरीब बिचारीं माणसं तीं—सारे अक्षरशत्रू, पण कलेबद्दल केव्हढं प्रेम ! हें असं कांहीं पाह्यलं कीं मोठा परिणाम होतो मनावर— [ हंसायचा रडवा प्रयत्न करीत ] कशाला हव्यात त्या गोष्टी ! तुला काय होय कला ! [ जांभई देत ] कसा थकवा आलाय अगदीं. जागरण झालं ना फार ! आतां जरा पडतें आंत जाऊन.

[ ती उठून आंत जायला निघते तोंच रमेश येतो. ]

**रमेश** : थांब गौरी. मला बोलायचंय तुझ्याशीं.

**गौरी** : आतां नको. मग बोलूं. मला झोंप येतेय.

**रमेश** : ( हंसून ) यावेळीं झोंप ? चल ! थोडं बोलूं नकोस. चहा घे थोडासा म्हणजे उडेल झोंप. आम्हांला थोडा चहा दे पाहूं गंगूताई.

**गौरी** : मला नको चहा.

**गंगू** : मी जायला हवी ना इथनं ? चहाचं निमित्त कशाला करतोस ? मला कुठं ऐकायला हवंय तुमचं बोलणं--

**गौरी** : अन् मला देखील नकोय तें ऐकायला.

**रमेश** : अगदी जिवाभावाचा प्रश्न आहे गौरी. पांचच मिनिटं--

**गंगू** : मी जातें आपली. तुम्हीं बसा दोघं. ( जाते. )

**गौरी** : काय सांगायचंय तुला ?

**रमेश** : बैस ना. घरच्या घरांत उभ्याउभ्या बोलणं बरं दिसत नाहीं. बैस ना. ( ती बसते. क्षणभर दोघंही स्तब्ध. ) अगदीं मनाचा धडा करून आज मी तुला

विचारतोंय--गेले कांहीं दिवस कसे गेले ते तूं पाहिलेसच. बाबांनीं भाषण बंद केलंय माझ्याबरोबर. असं कांहीं चमत्कारिक वातावरण झालंय, कीं इथलं अन्न सुद्धां मला विषासारखं वाटतंय. फार प्रयत्न करून पाहिला मी—पण मनावर झालेला परिणाम कांहीं पुसून टाकतां येत नाहीं. अगदीं डाग लागल्यासारखा झालाय तिथं. ( क्षणभर थांबून ) बाबा म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं, जातच बदललीय माझी. कोळसेविक्याच्या घरांत परीट राहाणं शक्य नाहीं हेंच खरं. खरोखरच ब्राह्मण झालोंय मी—बाबा म्हणतात तसा युनिव्हर्सिटीचा ब्राह्मण. मनोरचनाच बदलून गेलीय माझी. त्याचमुळं हें वातावरण मला दुःसह होतंय— ( थांबतो. )

**गौरी** : झालं ?

**रमेश** : नाहीं. ही सुरवात झाली नुसती—

**गौरी** : एवढ्या मोठ्या सुरवातीचा पुढला ग्रंथ फारच मोठा असायचा. पुन्हा केव्हांतरी बोलूं आपण—मी जातें आतां.

**रमेश** : जरा थांब. या गोष्टीचा निकाल आजच्या आजच झाला पाहिजे.—हें घर सोडायचं असं ठरवलंय मी आज.

**गौरी** : केव्हां ?

**रमेश** : आजच. हॉस्टेलमधें मिळालीय एक जागा. तूर्त तिथंच राहाणार आहें. पण लौकरच माझी स्वतःची जागा मला मिळेल अशी आशा आहे मला— ( ज़रा थांबून ) ऐकलंस गौरी, आतां घर थाटायचंय मला—माझं घर—स्वतःचं घर—माझ्या इच्छेप्रमाणं अन् आवडीप्रमाणं वातावरण असलेलं माझं घर.

**गौरी** : पुरा विचार केला आहेस का या गोष्टीवर ?

**रमेश** : हो. अगदीं साधकबाधक साऱ्या गोष्टींचा पुरापुरा विचार करून मी केला आहे ह्या निश्चय. प्रश्न आहे तो एव्हढाच, कीं घर असलं म्हणजे गृहिणी हवी असते—

**गौरी** : कुंदा आहे ना ?

**रमेश** : नाहीं. तोही विचार करून पाहिला मी. तिचं माझं जमायचं नाहीं. तिला वैभव हवंय, ऐषआराम हवाय, मानमरातब हवाय—

**गौरी** : अन् तुला ?

**रमेश** : मला ? मला सुखाचा संसार हवाय.

**गौरी** : सुखाच्या संसाराची काय व्याख्या करतोस तूं? हा बाबांचा संसार—ऐषआरामाचा संसार–सुखासमाधानाचा संसार–हा संसार तुला रुचत नाहीं. हा संसार सुखाचा नाहीं का?

**रमेश** : हो. हा संसार सुखाचा आहे, स्वास्थ्याचा आहे. श्रीमंतीचा देखील आहे—पण समाधान नाहीं यांत. तें समाधान पाहिजेय मला. कुंदेसारख्या वैभवाला लालचावलेल्या मुलीच्या सहवासांत समाधान मिळेल असं नाहीं वाटत मला.

**गौरी** : तुझ्या शिष्यवर्गांत तशी दुसरी कोणी नाहीं का आढळली तुला? नाहीं? मग जोडीदारांत?

**रमेश** : कुठल्या जोडीदारांत?

**गौरी** : तुझ्या परिचयाच्या इतर कुठल्या तरी परिवारांत?

**रमेश** : हो. एक सांपडलीय तशी.

**गौरी** : मग तिच्याबरोबरच थाटणार आहेस का हा नवा संसार?

**रमेश** : हो.

**गौरी** : मग प्रश्नच मिटला! तुझी परिस्थिति माहीत आहे ना तिला? असलेलं वैभव लाथाडून तूं खुषीचं दारिद्र्य पत्करतोयस हें माहित आहे का तिला? अशा या दारिद्र्यांत राह्यची तयारी आहे का तिची?

**रमेश** : तेंच कळायला हवंय मला.

**गौरी** : मग सरळ सरळ विचार ना तिला.

**रमेश** : तेंच विचारतोंय मी तुला.

**गौरी** : मला?

**रमेश** : हो. तुला. आतां तुझ्या प्रश्नांचीं तूंच दे उत्तरं.

**गौरी** : उत्तरं होय?—पांच वर्षांपूर्वीची आठवण कर, मी एक रस्त्यावरची भिकारीण होतें. माझ्या आयुष्यांतला मोठ्यांतला मोठा भाग भीक मागण्यांत गेला. दैन्य, दारिद्र्य, दुबळेपणा, हालअपेष्टा मी अनुभवल्यायत त्या आयुष्याच्या पहिल्या सोळा वर्षांत. या पांच वर्षांत माझा नवा जन्म झालाय. अगदीं उत्तर आणि दक्षिणध्रुवाइतकं अंतर आहे त्या दोन्ही काळांत. तो जुना काळ पुसून टाकलाय मी माझ्या आठवणींतून, पण हृदयाच्या कुठल्यातरी सांदिकोपऱ्यांत ती जुन्या काळची जाणीव तशीच राह्यलीय धगधगत. तें तसलं दारिद्र्य पुन्हां

माझ्या वाट्याला आलं तर दुःसह होईल का, असा प्रश्न सुद्धां केव्हां केव्हां करतें मी स्वतःला—( थांबते. )

**रमेश** : मग काय उत्तर मिळतं तुला ?

**गौरी** : तें दारिद्र्य कांहीं पुन्हां दिसायचं नाहीं मला. एक कला संपादन केली आहे मी. ती माझी कला मला दारोदार भीक मागायला द्यायची नाहीं. त्या कलेचा आविष्कार करायचं सामर्थ्य माझ्या अंगीं आहे तोंपर्यंत सुखासमाधानाची वाण पडायची नाहीं मला.

**रमेश** : होय ना ?

**गौरी** : हो. त्या खात्रीवरच मी जगलें आहें. पण समज, उद्यां माझा पाय मोडला, माझं अर्धांग गेलं—

**रमेश** : तर तुला पुरेशा सुखांत ठेवण्याइतका पगार मिळतोय मला. वैभव नसेल, पण स्वास्थ मात्र खास मिळेल.

**गौरी** : असं वाटतं खरं.

**रमेश** : मग ?

**गौरी** : गेली पांच वर्षं आपण दोघं एका जागीं आहों. तसा सारखा सहवास झालेला नाहीं आपला, पण एका घराची जाणीव पुरेपूर आहे मला तरी. तुझा स्वभाव मला माहीत आहे–तुझे गुणदोष मला माहीत आहेत—माझे गुणदोष तुला माहीत आहेत कीं नाहींत तें तुझं तुला माहीत; पण या एव्हढ्या काळांत आपण दोघं कांहीं फारशीं जवळ आलों नाहीं एकमेकांच्या. तुझ्या दृष्टीनं पहायचं म्हणजे कुठल्यातरी परक्या मुलीपेक्षां मी तुला जास्त जवळची आहें. माझ्याही दृष्टीनं तसंच आहे—

**रमेश** : होय ना ! मग आतां अडचण कुठं राहली !

**गौरी** : तसं म्हटलं तर अडचण कांहींच नको आहे. बाबांना विचारायचा प्रश्न आहे खरा, पण माझी खात्री आहे, कीं माझ्या इच्छेच्या आड ते यायचे नाहींत. ( क्षणभर थांबून त्याच्याकडे पाहून हंसून ) जातें मी. मला झोंप येतेय फार. ( एकदम उठून आंत जाते. )

[ रमेश क्षणभर बुचकळयात पडल्यासारखा दिसतो पण लगेच आपल्याशींच हंसूं लागतो. तो आपल्याशींच गुणगुणत येरझाऱ्या घालतो इतक्यांत कुंदा येते. ]

**कुंदा** : ( रमेशला पाहून दचकून ) आली का गौरी ?

**रमेश** : गौरीकडे आली होतीस वाटतं ?

**कुंदा** : इथं आलें होतें मी. इथं यायचं म्हणजे कोणाकडे यायचं हें कांहीं निश्चित सांगतां येत नसतं. मकाजीबुवा म्हणतात तसा हा एक क्लब आहे. मागाशीं आलें होतें त्यावेळीं इथं कुणीच नव्हतं. गौरी काल गेली ती अजून आली नाहीं असं गंगूताईनीं सांगितलं—म्हणून विचारलं मी.

**रमेश** : म्हणजे तूं माझ्याकडे नाहीं आलीस ! यापूर्वी तूं इथं येत होतीस ती माझ्याकडे माझ्यामुळं तुझी नी गौरीची ओळख, पण आतां मी समोर दिसत असतांना तूं गौरीची चौकशी करतेयस ! काय समजावं मी ?

**कुंदा** : काय वाटलं तुम्हांला ?

**रमेश** : मला वाटलं कीं तू मला आतां पारखी झालीयस.

**कुंदा** : फार संशयी झालां आहांत तुम्ही अलीकडे. तरी बरं, इथं तसा दुसरा कुणी पुरुष नाहीं. गौरीचीच चौकशी केली मी. तसा बराच लोभ लागलाय तिचा मला अलीकडे. मोठा **लौकिक** आहे ना तिचा ! प्रत्येक वर्तमानपत्रांत सारखे फोटो झळकत असतात तिचे. अशा लौकिकवान व्यक्तीचा ओढा कां वाटूं नये मला ?

**रमेश** : त्यांत कांहीं गैर नाहीं. पण मी होतों इथं. मी इथं समोर दिसत असतांना सुद्धां तूं तिची चौकशी करूं लागलीस तर काय वाटेल मला ?

**कुंदा** : तें मी कसं सांगूं ?

**रमेश** : मी सांगतों. फार दुःख झालं मला तुझ्या या प्रश्नामुळं. आतां तूं बी. ए. झालीयस—फर्स्ट क्लास बी. ए ! प्रायझेस मिळालींयत तुला. आपला गुरुशिष्याचा संबंध संपलाय आतां. अन जो संबंध जोडावा असं आपण म्हणत होतों त्याची अजून आठवण आहे मला, म्हणून मला मोठं दुःख झालंय.

**कुंदा** : साहजिक आहे.

**रमेश** : बस् ! झालं ?

**कुंदा** : नाहीं ! तुम्ही बोलतच नाहीं कांहीं. बोलायचं आहे तें तुम्ही. मी नव्हे. शिरस्ता आहे तो असा !

**रमेश** : आधीं माझ्या प्रश्नाचं उत्तर दे. दोन खेपा इथं टाकल्यास त्या गौरीची चौकशी करण्यासाठींच का ?

**कुंदा** : मी होय म्हटलं तर तुम्हांला काय वाटेल ?

**रमेश** : कांहीं वाटायच्या पलीकडे गेलोंय मी. आधीं माझ्या प्रश्नाचं उत्तर दे.

**कुंदा** : तर मग ऐका—मी आलें होतें ती तुम्हांला भेटायला. तुमची भेट होईल त्यावेळीं गौरी इथं असावी असं वाटलं होतं मला. आतां ती नाहीं. असती तर बरं झालं असतं. पण आतां तिच्यासाठीं मी थांबत नाहीं. काय करायचं आतां ?

**रमेश** : म्हणजे ? कोणत्या बाबतींत ?

**कुंदा** : आपल्या लग्नाच्या बाबतींत.

**रमेश** : ऐक तर—मी हें घर सोडणार आहें. मला जो कांहीं थोडासा पगार मिळतो तेवढ्यावरच संसार थाटणार आहें. अशा परिस्थितींत माझ्याशीं लग्न करायची आहे का तुझी तयारी ?

**कुंदा** : दरमहा दीडशें रुपये मिळविणाऱ्या बापाची मी मुलगी आहें. आमच्या कुटुंबाला माणसंही आहेत बरींच, तेव्हां त्या दृष्टीनं पहातांना तुमचा पगार माझ्यालेखीं श्रीमंतीच्याच तोलाला येतो. तुम्ही स्वतंत्र राह्यलांत तरी मला त्याचं कांहीं वाटायचं नाहीं. माझी तयारी आहे.

**रमेश** : हा अविचार होईल असं नाहीं तुला वाटत ? माझ्यापेक्षां जास्त संपन्न असं स्थळ तुला मिळणं कठीण नाहीं. आज माझ्याशीं लग्न केलंस तर उद्यां पश्चात्ताप होणार नाहीं अशी खात्री आहे तुझी ?

**कुंदा** : पुढं काय वाटेल तें आज मी कसं सांगूं ? पुढं काय होईल कुणी सांगावं ! आतां लोकराज्य झालंय. कुणी सांगावं, तुम्हांला आजच्या सरकारांत एखादी मोठी जागा सुद्धां मिळून जाईल !

**रमेश** : मला कांहीं अशी आशा नाहीं.

**कुंदा** : पण मला आहे. शिवाय मी असं म्हणतें, हें घर सोडावं असं कां येतं तुमच्या मनांत ? कितीही मोठी नोकरी मिळाली तरी हें वैभव कांहीं तिथं मिळायचं नाहीं. वाढती श्रीमंती आहे ही ! तुम्ही इथं राह्यलांत, आपल्या वडिलांचाच व्यवसाय पाहूं लागलांत—

**रमेश** : म्हणजे नाक्यावर उभा राहून मी वर्तमानपत्रं विकावींत असं का तुझं म्हणणं ?

**कुंदा** : असं कुठं मी म्हणतें ? तुमच्या वडिलांचे मॅनेजर आहेत, त्यांना पगार मिळतो दरमहा पांचशें रुपये. तें काम तुम्ही कां करूं नये ?

**रमेश** : व्यवहाराच्या दृष्टीनं तुझं म्हणणं बरोबर आहे. पण पैशाच्या लालचीमुळं

माझा दर्जा खर्ची घालणं अशक्य होतंय मला. ती माझ्या पदवीची जाणीव केव्हांही तसं करूं देणार नाहीं मला.

**कुंदा** : जन्मभर श्रीमंतींत लोळत असतांना या ऐन तारुण्यांत दारिद्र्यांत दिवस काढतां येतील असं खरोखरच का वाटतं तुम्हांला ?

**रमेश** : मुळींच नाहीं. म्हणूनच मला वाटतं, कीं माझ्या पत्नीनं असा ठेवा बरोबर आणला पाहिजे--

**कुंदा** : कीं तिच्या पैशाच्या जोरावर तुम्हांला चैन करतां येईल ! होय ना ?

**रमेश** : नाहीं कसं म्हणूं ? निदान ती स्वतः तरी भरपूर पैसे मिळविणारी असली पाहिजे. बाबांच्या श्रीमंतीवर आज मी सुखांत आहें, तसाच तिच्या श्रीमंतीवर राहीन ! मला तिचा **पैसा** नको आहे—तिचा पैसा नको आहे मला, तिच्या पैशानं मिळणारं स्वास्थ्य पाहिजे आहे मला. खुशाल तिचा पैसा घेऊन ती बसूं दे –

**कुंदा** : मग मला आणा नाहीं.

**रमेश** : स्पष्ट सांगायचं म्हणजे— नाहीं. उगीच तुला संशयांत कशाला ठेवूं ? मला वाटतं पूर्वी मी एकदा असं कांहींतरी बोललों होतों तुझ्याकडे—

**कुंदा** : हो. गौरीचा उल्लेख केला होता तुम्ही त्यावेळीं मला आठवतं तें. तसं होणं कांहीं अशक्य नाहीं आतांच्या या तुमच्या अटी गौरीला सहज पुऱ्या पाडतां येतील.

**रमेश** : त्याचा निर्णय तुझ्याकडून नकोय मला. तें माझं मी पाहून घेईन. तुझ्यापुरतं बोलायचं म्हणजे— ( ' पांडोबा, पांडोबा ' अशी हांक मारीत मकाजी प्रवेश करतो. )

**मकाजी** : आला का पांडोबा ?

**रमेश** : मला नाहीं माहीत. अगदीं नको त्यावेळीं यायला कोण सांगतं या माणसांना ?

**कुंदा** : या मकाजीबुवा, बसा. बाबा येतील आत्तांच. मला वाटतं ते गौरीच्या तपासासाठीं गेलेयत.

**मकाजी** : तपासासाठीं ? म्हणजे ? हरवलीय कीं काय ती ?

**रमेश** : आंत आहे गौरी. झोंपलीय ! मगाशींच आली ती.

**कुंदा** : मला हें सांगितलं नाहीं तुम्ही. [ रमेश खवचटपणें हंसतो. ] अस्सं !

**मकाजी** : हरवली होती वाटतं ती कुठं ? गौरी म्हणजे काय, उडतं पांखरूं आहे तें. राह्यली असेल कुठंतरी भिरभिरत.

**कुंदा** : काल रात्रीं बापूच्या तमाशाला गेली होती ती, ती हा वेळपर्यंत आली नव्हती. आली म्हणून आतां हे सांगताहेत— [ रमेश एकदम उठून बाहेर जातो. ] बोलावूं का तिला !

**मकाजी** : नको नको—झोंपली असली तर झोपूं दे तिला. सारी रात्र तमाशा पहात राह्यली असेल—असं ! एकूण तमाशा पाह्यला गेली होती गौरी ! छान छान ! एकदां तो पाह्यलाच हवा होता तिनं. ती नाचते ! कसली नाचते ! त्या आमच्या पूर्वीच्या चंद्री, पवळी अन् हौशी पाह्यला हव्या होत्या तुम्ही लोकांनीं. एकेक नाचूं लागल्या, कीं थेटर कोसळून पडत होतं. हा कसला यांचा इटुकला पिटुकला नाच ! डुलतात नुसत्या ! अश्यान् अश्या ! तो कांहीं मराठ्याच्या घरचा अस्सल नाच नव्हे. ते पूर्वीचे आमच्या कोल्हाटणींचे नाच पाह्यला हवे होते तुम्ही. तरवारीच्या धारेवर नाचत त्या. या हातांत एक समई, या हातांत एक समई अन् डोक्यावर एक समई. सात सात पेटत्या वाती असत त्या समयींत. हंः ! गेले ते नाच ! आतां हे तुमचे नाच म्हणजे ढोंग नुसतं नाचाचं. पाय हालवतात म्हणून नाचतात म्हणायचं. तसं नाच म्हणावं या गौरीला. तर तूं खरी मराठ्याची अवलाद !-गोविंदा नाहीं आला वाटतं ? गौरी आली ना ? मग बापू आला नाहीं तिच्याबरोबर ?

**कुंदा** : मला कांहींच नव्हतं माहीत. हें आत्तांच सांगितलं यानीं.

**मकाजी** : कुठं गेलाय हा पांडोबा ? गौरी तमाशाला गेली होती होय ? कुठं गेली होती ? शिवडीला कीं डिलाईल रोडला ?

**कुंदा** : माझी तिची भेट झाली नाहीं अजून. शिवडीला अन् डिलाईल रोडला आहेत वाटतं तमाशाचीं थिएटरं ?

**मकाजी** : तुमच्यासारख्या धवेल्यांना काय होय त्याचं ? तुम्हीं आपले शिनेमे बघा. पाऊणशें शिनेमे आहेत या मुंबईत पण एकसुद्धां नाटकाचं थिएटर नाहीं राह्यलं आतां. पूर्वीं असं होतं, पिला हाऊसवर नाटक बघायचं अन् तें संपलं कीं तमाशा बघायचा. असं चालत असे तेव्हां आमचं. आतां कुठं तरी खोपटं उभारून तमाशे करताहेत आमचे तमाशेवाले आपल्या जुन्या गोष्टी म्हणून सांगायच्या. ती जुनी आठवण आली कीं रडूं येतं आम्हांला. गेले ते दिवस अन् त्याबरोबरच गिरान्‌डोलवरचा तमाशाही गेला.

**कुंदा** : आम्हांला कांहींच माहिती नाहीं यांतली. अन् आम्हाला कशाला जरुरी पडतेय या माहितीची ? म्हणूनच मी केव्हांच विचारलं नाहीं गौरीला. आणि तिला तरी कुठं यांतलं कांहीं माहीत आहे ? आतां ती भेटली–

[ ती बोलत असतांना पांडोबा येतो. ]

**पांडोबा** : आलास मकाजी ? आज जरा उशीरच झाला मला. गोविंदा नाहीं आला अजून ? बरं झालं, गौरी आली. वाटेंतच भेटली ती मला. सारा दिवस माझा जीव टांगला होता. पण बापू काय तिला जेवल्याशिवाय जाऊं देतो ?

**मकाजी** : ती जेवली कीं काय बापूकडे ?

**पांडोबा** : मी देखील जातों की त्याच्याकडे जेवायला मधून मधून. आतां तें सारं गेलं बरं मकाजी. मोठी सुंदर आहे खोली त्याची. अन् घरांतली व्यवस्था पहाशील तर बामणांनीं सुद्धां लाजावं. आतां चल जरा खाऊन घेऊं. जेवलों नव्हतों दुपारीं. थंड झालीं असतील भजीं नि पोहे देखील. तूं येतेस का कुंदा ? गौरी कुठंय ? तुला इथं एकटीच बसवून आंत काय करतेय ती ?

**मकाजी** : तुला यायला वेळ नाहीं ना ? आतां तो इजनेर येणार आहे माझी नवी चाळ तपासायला–म्हणून आलों होतों तुला बोलावायला–मी जातों तर ! तूं घे फराळ करून.

**पांडोबा** : बरं, बरं. जा तर.

[ मकाजी जातो–पांडोबा घरांत जातो. बाहेरून गोविंद येतो. ]

**गोविंद** : बाबा आलेत ना आत्तां ?

**कुंदा** : हो. आत्तांच आंत गेले ते फराळ करायला.

**गोविंद** : अन् तुम्ही नाहीं गेला ?

**कुंदा** : मला बोलावीत होते ते–पण तशी भूक नव्हती मला.

**गोविंद** : मी सुद्धां आलोंय आत्तांच चांगला ताव मारून. ( बसतो. दोघेंही क्षणभर स्तब्ध. )

**कुंदा** : डॉक्टर रमेश आज म्हणत होते, हें घर सोडून ते जाणार आहेत— स्वतंत्र बिऱ्हाड करून राहाणार आहेत.

**गोविंद** : अन् तें खरं वाटलं तुम्हांला ?

**कुंदा** : हो. लग्न करणार आहेत ते आतां.

**गोविंद** : तुमच्याशीं ?

**कुंदा** : नाहीं.

**गोविंद** : तर कुणाशीं ?

**कुंदा** : गौरीशीं. ( गोविंद मोठमोठ्यानें हंसतो. ) हंसण्याची गोष्ट नव्हे ही. खरोखरच त्यानीं तसं सांगितलं मला आतां.

**गोविंद** : गौरीची कबुली मिळाली ?

**कुंदा** : तें कांहीं मला माहित नाहीं. ती कां नाहीं म्हणेल ? एका घरांतली माणसं—एकमेकांचा स्वभाव एकमेकांना माहीत असलेला—

**गोविंद** : म्हणूनच मी विचारलं. तिचं त्याचं कधींच पटलं नाही. माझ्या समजाप्रमाणं तो द्वेष करतो तिचा. ती कुणाचाच द्वेष करीत नाहीं. तरीपण त्याचं अन् तिचं फारसं जमत नाहीं हें मी इतकी वर्षं पाहतोंय. मला नाहीं हें खरं वाटत. लग्नाचा विचारसुद्धां तिच्या डोक्यांत असेल कीं नाहीं याचीच शंका आहे मला. शिवाय तिचा संबंध येतो तो फार मोठमोठ्या माणसांशीं. मोठमोठे लक्षाधीश सुद्धां मागणी घालत होते तिला. पण सर्वांनाच धुडकावून लावते ती.

**कुंदा** : आश्चर्य आहे–तुमचं देखील असंच आहे का ?

**गोविंद** : काय भलताच प्रश्न करतां हा ? असा कोण आहें मी ? या तळपत्या जगाच्या इतिहासांत मला एव्हढी सुद्धां जागा नाहीं. राम प्रोफेसर आहे, गौरी एक प्रख्यात नर्तकी आहे, तुम्ही देखील एक पदवीधर आहां–उद्यां तुमचाही कुठं ना कुठं नांवलौकिक होईल–पण माझ्यासारख्या गाडीवाल्याला कोण घेणार आहे हिशेबांत !

**कुंदा** : मी !

**गोविंद** : म्हणजे ?

**कुंदा** : पूर्वीं तुम्हांला एकदां मी विचारलं होतं- -

**गोविंद** : मला ती थट्टा वाटली होती.

**कुंदा** : ती थट्टा नव्हती. खरोखरच मी मनापासून विचारलं होतं–आजसुद्धां विचारतें.

**गोविंद** : मी एक अडाणी माणूस आहें कुंदाताई. कशाला माझी उगीच अशी कसोटी पहातां आहां ? स्वप्नांत सुद्धां मला हें खरं वाटायचं नाहीं.

**कुंदा** : पण प्रत्यक्ष मी विचारतेंय आतां. बी. ए. होण्यासाठीं थांबलें होतें –तें आतां झालं. आतां कांहींतरी आयुष्याची दिशा ठरवली पाहिजे मला. अगदीं

खुल्या दिलानं बोलतेंय मी. पूर्वीं मला पदवीचं चोज वाटत होतं. आतां ती मिळाली तेव्हां असं वाटतं, कीं काय विशेष मिळवलं मी ? गौरी अगदीं अशिक्षित आहे, पण तिनं एक कला साध्य केली आहे. त्या कलेच्या जोरावर जशी ती सर्वांना दिपवून टाकतेय, तसा जोर आहे का माझ्या या पदवींत ? डॉक्टर रमेशना सुद्धां तिच्याशीं लग्न करावं असं वाटूं लागलं—एका काळीं त्यांचं आणि आणि माझं ठरलेलं असतांनासुद्धां तें वचन मोडून गौरीशीं लग्न करावं असं ते म्हणूं लागले-अशिक्षित माणसांबद्दल तिटकारा असतांनासुद्धां ते असं म्हणूं लागले, याचाच परिणाम झालाय माझ्या मनावर. ती लौकिकाची झळाळी कुणाला आकर्षक वाटणार नाहीं ?

**गोविंद** : खरंय तें.

**कुंदा** : होय ना ? म्हणूनच मी तुम्हांला विचारतें—

**गोविंद** : पण तसला लौकिक कुठं आलेला आहे माझ्या वांट्याला ?

**कुंदा** : एक लौकिक तरी पाहिजे किंवा एक पैसा तरी पाहिजे. दिपवून टाकणारी झळाळी असते ती एका लौकिकाला किंवा एका श्रीमंतीला. गौरी लौकिकवान आहे म्हणून विद्वान असलेल्या डॉक्टर रमेशना तिचं आकर्षण वाटलं. तुम्ही श्रीमान आहां म्हणून मलासुद्धां तुमच्याबद्दल—

**गोविंद** : कृपा करून असलं कांहीं बोलूं नका. हें असलं आकर्षण माझ्या ओळखीचं नाहीं मी तरुण असलों तरी जुन्या काळच्या प्रपंचांत वाढलेला आहें—एका परीनं जुनापुराणा आहें. असल्या गोष्टी नुसत्या ऐकणं सुद्धां मला कठीण जातंय.

**कुंदा** : दुसऱ्या कुठं जमलंय का तुमचं ?

**गोविंद** : जमायचा प्रश्नच नाहीं. तसल्या कल्पना माझ्या डोक्यांत येतसुद्धां नाहींत. मी सांगितलं होतं ना तुम्हांला, लग्न करायची वेळ येईल त्यावेळीं अशीच माझ्यासारखी एकादी अडाणी मुलगी पत्करावी लागेल मला. तुमच्या-माझ्यांत जमीनअस्मानचं अंतर आहे.

**कुंदा** : ( हंसून ) किती विलक्षण बोलतां तुम्ही ? कसलं आलंय अंतर ? अंतरच म्हणायचं तर तें मला जाणवलं पाहिजे होतं— तुम्हांला नव्हे. तुम्ही श्रीमंत आहां, मी गरीब आहें—

**गोविंद** : तुम्हीही श्रीमंतच आहांत. तुमची श्रीमंती आहे ती विद्वत्तेची—

**कुंदा** : दरिद्री विद्वानाला कोण विचारतं या जगांत ?

**गोविंद** : कां बरं ? आज आपलं हें राज्य चालवताहेत ते काय श्रीमंत आहेत ? दरिद्रीच आहेत सगळे.

**कुंदा** : ते नुसतेच विद्वान नाहींत---त्यागी आहेत ते. जन्मभर खर्ची पडले यत देशासाठीं ! नुसत्या पदवीच्या जोरावर मोठेपणा आलेला नाहीं त्यांना. जगाच्या नजरेंत झळझळीतपणें भरतो तो एक देशभक्त किंवा एक कलावंत ! एखाद्या वेळीं कलावंत या देशभक्तावर सुद्धां मात करतो--नाहीं ?

**गोविंद** : हो. मी पाह्यलेयत ते प्रसंग. एखाद्या लोकप्रिय नटाची सही घेण्यासाठीं देशभक्ताला टाकून नटामागं लागलेलीं माणसं मी पाह्यलीं आहेत.

**कुंदा** : होय ना ? आतां तुम्हीच सांगा, कलेच्यापुढं विद्वत्तेची कसली प्रतिष्ठा ?

**गोविंद** : ( हंसून ) पण मी कलावंत नाहीं.

**कुंदा**: श्रीमंत आहां !

**गोविंद** : श्रीमंत सुद्धां धांवतात कलावंतांच्या मागं. विचारा ना गौरीला.

**कुंदा** : दुसरा दर्जा तरी द्याल श्रीमंतीला ? दुसऱ्या दर्जावर मी खूष आहें. कलेचा दर्जा सर्वश्रेष्ठ असला तरी सारेच कलावंत कांहीं श्रीमंत नाहींत. नुसत्या लौकिकानं कांहीं पोट भरत नाहीं---( आंतून येत असतांना गौरी : " नुसत्या लौकिकानं खरोखरच पोट भरत नाहीं. " असें म्हणून मग बाहेर येते. )

**गौरी** : मी पुन्हां सांगतें, नुसत्या लौकिकानं पोट तर भरतच नाहीं, उलटी भूक मात्र अनावर होते.

**कुंदा** : कसली ? लौकिकाची कीं श्रीमंतीची ?

**गौरी** : दोहोंचीही ! कुणाला दोन्हीं मिळतात, कुणाला एकही मिळत नाहीं---अन् कुणाकुणाला दोन्हींही मिळालीं तरी समाधान मिळत नाहीं ! कुठं मिळतं हें समाधान ?

**गोविंद** : ( गौरीकडे बिचकून पहात ) गौरी !

**गौरी** : काय ?

**गोविंद** : काय झालंय आज तुला ? अगदीं साफ बदलून गेलीयस !

**गौरी** : कालपर्यंत मी एक पोर होतें---बाबांची लाडावलेली पोर होतें---एका रात्रींत मी एकदम जाणती झालें.

**कुंदा** : काय झालं एका रात्रींत ?

**गौरी** : नवं जग पाह्यलं मी काल रात्रीं. असलं कांहीं अजब जग कुठं असेल असं केव्हां वाटलं सुद्धां नव्हतं मला. तें जग माझ्या आजूबाजूलाच वावरत होतं.

पण मला त्याची जाणीव नव्हती. नांदत असून दृष्टीआड राह्यलेलं तें जग जेव्हां माझ्या नजरेसमोर आलं, तेव्हां माझा मोठेपणा कुठल्या कुठं विरघळून गेला--

**कुंद्रा** : मोठेपणा ?

**गौरी** : हो. मोठेपणाच. सर्वांनींच लाडावून ठेवली होती मला. त्या तुम्हां लोकांच्या लाडांमुळं मला अस्मान ठेंगणं झालं होतं. तें हें एवढंसं चार श्रीमानांचं आणि विद्वानांचं कोंडाळं म्हणजेच सारं जग, असं मला वाटत होतं. खऱ्या जगाचं विराट स्वरूप काल मी पाह्यलं अन् माझ्या अभिमानाचा चेंदामेंदा होऊन गेला.

**गोविंद** : कुठं पाह्यलंस हें जग ?

**गौरी** : गिरणगावांत ! बापूचा तमाशा पहायला आलं होतं तें जग. देवानं निर्माण केलेलं होतं तें जग. देवाघरचीं माणसं होतीं तीं ! अस्सल जातिवंत माणसं ! बावनकशी सोनं होतं तें. तिथं विद्वत्तेचा मुलामा नव्हता, कीं श्रीमंतीची जिल्हईही नव्हती. माणसाच्या अत्याचारानं बिघडलेलं नव्हतं तें जग. जसं देवानं घडवलं तसंच होतं तें जग. अफाट समुद्र होता तो. लाटांवर लाटा उसळत होत्या त्या समुद्रांतून. तें माणुसकीचं वादळ पाहून माझं भान हरपलं. मी विसरून गेलें स्वतःला. अगदीं एकजीव होऊन गेलें त्या माणुसकीच्या झंजावातांत. तिथंच सांपडलं मला कलेचं बीज. तिथंच सांपडली मला आपलेपणाची जाणीव. कोणत्या शब्दांनीं वर्णन करूं तें ? बोलायच्या गोष्टी नव्हेत त्या—

**गोविंद** : मी पाहिलंय तें जग—मी पोहलोंय त्या समुद्रांत. तीं दोन्हीं जगं मी पाह्यलींयत ! गिरगांव आणि गिरणगांव—कोट आणि शिवडी—मलबार हिल आणि वडाळा—सारं जग पालथं घालीत असतों मी. त्या विराट स्वरूपाचं दर्शन पूर्वींच झालंय मला.

**कुंद्रा** : [ अर्धवट स्वगत ] कसली भाषा आहे ही ! काय बोलतांहां तुम्ही दोघं ? कुठल्या जगाचं वर्णन आहे हें ? मला दिसेल का हें जग ?

**गोविंद** : जो पाहील त्याला दिसेल. विद्वत्तेचं डोळेझाकणं लावून पांढरपेशांच्या चाकोरींतून फिरणाऱ्या घाण्याच्या बैलाला कसं दिसणार हें जग ? हें जग पाहण्यासाठीं फिरलं पाहिजे रस्तोरस्तीं—[ पांडोबा प्रवेश करतो. ]

**पांडोबा** : माझ्यासारखा—वर्तमानपत्रं विकीत !—कसल्या रे चालल्या होत्या जगाच्या गोष्टी ? ( गौरीला ) अन् तूं सुद्धां उठलीस का ? भलत्याच वेळीं क झोंपली होतीस ?

**गौरी** : झोंपलेलीच होतें मी अजूनपर्यंत. काल रात्रीं जागी झालें.

**पांडोबा** : काल रात्रीं ? ऐक गोविंदा, लोकं झोंपतात त्यावेळीं ही जागी झाली ! [ पाहून ] काय झालं ग ? डोळे कां भरून आलेयत तुझे ? बोल ना.

**गौरी** : कां पाठवलंत मला तिकडे ?

**पांडोबा** : कुणीकडे ?

**गौरी** : तमाशा पहायला—बापूंचा.

**पांडोबा** : काय झालं तिथं ?

**गौरी** : काय झालं तिथं !-खरं जग दिसलं मला तिथं.

**पांडोबा** : तेंव्हढ्यासाठींच तर मी पाठवलं तुला. तीच जागा आहे खरं जग पाह्यची ! देवाघरचं जग आहे तें.

**कुंदा** : अगदीं हेंच म्हणत होती ती.

**पांडोबा** : अगदीं हेंच म्हणत असतों मी रोज ! रोज ती तें ऐकत होती, पण तिला कळत नव्हतं. बेगडी जगाच्या झगझगाटाला भाळून गेली होती ती. पूर्वींच माझ्या ओळखीचं झालं होतं हें जग—पोस्टमन होतों ना मी ? पुढं वर्तमानपत्रं विकूं लागल्यापासून सगळ्या जगाचे सगळे कानेकोपरे माझ्या ओळखीचे झालेयत. माणसं ओळखतां येऊं लागलीं. कुठलं वर्तमानपत्र कोण घेतो आणि कुठलं वर्तमानपत्र किती खपतं याच्यावरून मी अंदाज घेऊं लागलों माणसामाणसाचा. लढाईचे दिवस होते ते पूर्वींचे-लढ्याचे ! लढ्याच्याच गोष्टी बोलत होते सगळे त्यावेळीं. त्याच गोष्टी आवडत होत्या सर्वांना. लोकांना चेतवणाऱ्या नाटकांना बंदी होती. तसलीं नाटकं वगाच्या नावांखालीं तमाशेवाले करून दाखवीत होते. साध्यासीध्या माणसांत या तमाशांनीं कशी खळबळ उडवून दिली होती तें त्यावेळीं कळलं नाहीं पांढरपेशांना—आज सुद्धां कळलेलं नाहीं. तो तमाशा काल तूं पाहिलास गौरी ?

**गौरी** : नाहीं. मी नुसता तमाशाच पाहिला नाहीं—तमाशाला आलेलीं तिथलीं माणसं पाहिलीं. तीं माणसं पाहून मी वेडी झालें.—बापू आले नाहींत अजून ?–तीं माणसं पाहून मी वेडी झालें ! असं वाटलं— ( बापू येतो. )

**पांडोबा** : आलास बापू ? अगदीं शंभर वर्षं आयुष्य आहे तुला. तुझीच गोष्ट निघाली होती. काय केलंस या पोरीला ?

**बापू** : माझा तमाशा दाखवला.

**गौरी** : नाहीं. देवाचं अस्सल जग दाखवलं मला—

**बापू** : ही जेव्हां नाचूं लागली तिथं—

**गोविंद** : ही ! ही गौरी ! ही गौरी नाचली तुमच्या बारींत ?

**बापू** : हो. ही गौरी नाचली या बापू मांगाच्या बारींत. ते पूर्वींचे तमाशे राहिले नाहींत ना आतां ! आतां या आपल्या नव्या राज्यांत जुनी परंपरा झालीय सुरू. तीं हल्लींची फिल्मी गाणीं छाटून टाकलींयत आम्हीं आतां. रामजोशांनीं तमाशांत भक्तीची परंपरा सुरू केली-गणगौळण चालू केली-अनंतफंदी, होनाजी बाळ, सगनभाऊ, प्रभाकर, तुळशीदास या कवींनीं मराठ्यांचं अस्सल गाणं आणलं तमाशांत. मुलुखगिरीवर निघालेल्या मर्द मराठ्यांचीं कवनं अन् मराठ्याघरच्या प्रेमळ कुटुंबांतल्या गोड गोड प्रसंगांनीं छावून टाकल्या होत्या आमच्या लावण्या-त्या आतां पुनः सुरू केल्यायत आम्हीं. ती तसली मराठमोळ लावणी सुरू झाली—कधीं साथ केली नव्हती-पण हलगीची थाप ऐकतांच फुरफुरली ही पोर. तिनं विचारलं, मी होय म्हटलं अन् ही नाचूं लागली तसं सारं थेटर घेतलं डोक्यावर जमलेल्या लोकांनीं. चवल्यावर चवल्या फेकूं लागले लोक. रास पडली रुपयांची. माझ्या उभ्या जन्मांत कधीं एव्हढा दौलतजादा गोळा केला नव्हता मी. असं वाटलं, जीव ओवाळून टाकावा या पोरीवरून—

[ क्षणभर सर्व स्तब्ध ]

**पांडोबा** : ( गौरीला जवळ घेऊन ) एकूण तूं नाचलीस तिथं ! **तिथं** नाचलीस ! ज्या बोर्डावर हे नाचतात म्हणून या खेड्यांतल्या कलावंतांना शहाणेसुरते लोक वाळींत टाकतात—त्या बोर्डावर नाचलीस ! सार्थक झालं तुझ्या कलेचं अन् सार्थक झालं माझ्या निवडीचं. असंच कांहींतरी व्हावं असं मला वाटत होतं. खोट्यांच्या त्या खोट्या शिफारसी-तीं इंग्रजी चोंचल्यांचीं कौतुकं बघून दुःख होत होतं मला. कसला नाच नाचलीस ग तिथं ? तो तसलाच का ?

**बापू** : नाहीं रे बाबा, तो तसला नाच मी पाहिला होता त्या दिवशीं. हा नाच कांहीं तरी अगदींच वेगळा होता. अगदींच अजब होता-असं वाटलं मला, कशी नाचतें आपण तें तिचं तिलाच कळत नसावं. अन् मग हलगीवालाही आला रंगांत. अन मग जें काय झालं तें बघायला तूं हवा होतास तिथं.

**गोविंद** : मला कां सांगितलं नाहींत बाबा ? मी तरी गेलों असतों-मी तरी पाहिलं असतं डोळे भरून. फार इच्छा होती माझी, कीं ही एकदां तिथं नाचावी —डोळे निवाले असते माझे.

**कुंदा** : काय चाललंय हें ! काय एकेक ऐकतेंय मी ? नुसतं वर्णन ऐकूनच कालवूं लागलंय माझ्या हृदयांत. पुन्हां येईल का हा योग कधीं ?

**बापू** : नाहीं. तें जें झालं तें होऊन गेलं. तें आतां पुन्हां व्हायचं नाहीं. पहिल्या दिवसाची थोरवी मोठी अजब असते. पहिलं नाटक, पहिला नाच, पहिला मुका, पहिलं मूल–या पहिल्यावहिल्या गोष्टींची गोडी कांहीं न्यारीच असते–नाहीं पांडोबा ?

**पांडोबा** : माझंच चुकलं—कां गेलों नाहीं मी ? आतां तें दिसायचं नाहीं मला पुन्हां. तें चित्र डोळ्यासमोर दिसतंय माझ्या. कां हट्ट धरला नाहींस ग पोरी मी यावं म्हणून ?

**कुंदा** : कलाकाराचं जीवन ! कल्पनेच्या पलीकडलं असतं हें जीवन ! वास्तवतेचा हात पोंचत नाहीं तिथं. कल्पनेनंच पहातेंय मी !—फुकट फुकट घालवलं मी माझं आयुष्य !

**गौरी** : ( डोळे पुसून ) बाबा, एक मागणं मागूं ?

**पांडोबा** : काय हवंय तुला पोरी ? आज असा आनंद झालाय मला—जें मागशील तें देईन—हा जीव टाकीन कुरवंडून तुझ्यावरून.

**गौरी** : फार कठीण आहे माझी मागणी. मोठं दुःख होईल तुम्हांला. कसे ते शब्द काढूं तोंडावाटे ? रस्त्यावरची भिकारीण होतें मी—मी नाचत होतें दारोदार--हात पसरला तरी पैसा मिळत नव्हता मला. तुम्ही मला आणलं, एक मोठी नर्तिका बनवलं–भिकारीण असतांना हात पसरला तरी पैसा येत नव्हता, आतां इथं हात पसरावा लागत नव्हता. पैसा येत होता, खूप पैसा येत होता, पण तो कुठून तरी सांदीकोपऱ्यांतून. पैसा येत होता म्हणून मोठा अभिमान वाटत होता मला. पण पैसा यायचं खरं वैभव काल पाहलं मी–बरसात झाली माझ्यावर—नुसती बरसात झाली चवल्यापावल्यांची. हिरेमाणकं उधळलीं माझ्यावर असं वाटलं मला— ( गहिंवरून थांबते. )

**बापू** : हिरेमाणकंच होती ग तीं पोरी ! हिरेमाणकच वाटतात तीं आम्हांला ! त्या चवलीचं मोल कुबेराला सुद्धां कळायचं नाहीं. कलेच्या तोलानं मिळत असतात त्या चवल्या. कुबेराचं भांडार फोडून उधळीत असतो देव--तो देवाचा प्रसाद मिळत असतो आम्हां तमाशेवाल्यांना. कुठल्या सुद्धां कलावंताला लाभत नाहीं तें भाग्य.

**गोविंद** : केव्हढी मोठी संधी गमावली ! भाग्यवान आहेस तूं गौरी ! हें भाग्य यापूर्वी लाभलं होतं का तुला कधीं ? त्या तुझ्या पांढरपेशानीं एक दमडी दुगाणी तरी उडवली होती का अशी ? फुलांचे तुरे मिळाले असतील तुला— पण या चवलीच्या पासंगाला तरी लागतील का ते ? कळलं कुंदाताई ? हें भाग्य आहे का तुमच्या पदत्रीला ?

**गौरी** : थांब गोविंदा, मला बोलूं दे. मोठा विचित्र विचार आलाय माझ्या मनांत नवा संसार थाटणार आहें मी. कलेचा संसार ! हा तुमचा असला संसार नव्हे ! काल मला नवी जाणीव झाली. ( तरळत्या मुद्रेनें ) आजवर मी कशासाठीं नाचत होतें ? पैशासाठीं ? बाबांच्या कृपेनं मला पैशाची वाण नव्हती. मग काय कीर्तीसाठीं ? कसली ती कीर्ति ! वर्तमानपत्रांतले बनावट लेख ! विद्वानांचे खोटे आशिर्वाद ? कीं श्रीमंतीनं फुगलेल्या मूर्खांची लाळघोटी जिभलेचाट ? सारं कांहीं स्पष्ट दिसतंय मला ! कशासाठीं होती ही माझी कला ? कुणासाठीं ?

**पांडोबा** : देशाच्या सेवेसाठीं. देशभक्तांचे सोनेरी बोल बगलेला मारून दारोदार फिरत असतांना एकच अनुभव आलाय मला—खर्चीं पडायचं तर देशासाठीं. आपण गुलाम होतों, तेव्हां सर्वस्वावर तुळशीपत्र ठेवून झगडणाऱ्या पुढाऱ्यांचे बोल एका हातानं कोटिशः हातीं देत होतों मी !-आज आतां आमचं राज्य झालंय. त्यागाचे धडे आम्ही तेव्हां घेतले—लहानमोठ्यांनीं आपापल्या परीनं लहानमोठा त्याग केला-स्वराज्य आलं आणि आतां सर्वांना विसर पडला त्यागाचा. राबायचं तर एका आपल्या देशासाठीं-ज्यानं त्यानं आपापल्या परीनं आपापली शक्ती खर्चीं घालायची असेल तर आपल्या राज्यासाठीं !—आमच्यासाठीं ! आम्ही म्हणजेच आमचं राज्य. (गहिंवरून) लढाईचा काळ गेला, आतां आपलं काम संपलं असं शहाण्यासुरत्यांना सुद्धां वाटूं लागलंय अलीकडे—त्यांना जागं केलं पाहिजे. कांहीं करायचं असेल पोरी, तर तें काम कर. तुझ्या पायांतला पैंजण वाजला तर हजारों लोक गोळा होतील—त्या हजारों लोकांना हा त्यागाचा संदेश दे.

**गौरी** : तेंच करायचंय मला. तुम्ही हात द्याल का मला बापू ?

**बापू** : काय करूं मी ! काय होणार आहे माझ्यासारख्या तमाशेवाल्याच्या हातून ?

**गौरी** : तुमच घर हवंय मला ! नवं घरटं बांधायचंय मला. नवी पांखर हवीय मला. त्या तुमच्या मायेच्या छत्राखालीं मला घ्याल का बापू ?

**बापू** : म्हणतेस तरी काय पोरी !

**गौरी** : तुमच्या तमाशांत घ्या मला.

**कुंदा** : तमाशांत ! म्हणतेस काय गौरी ! तूं तमाशांत जाणार ? तूं ?

**गौरी** : हो, मी ! कां असं आश्चर्य वाटलं तुम्हांला ? एकदां येऊन पहा. अस्सल काळजाच्या अस्सल माणसांचा मेळावा जमतो तिथं. तिथं लौकिकाची चाड नाहीं. पैशाची चाड नाहीं. त्या देवाच्या दौलतींत जाऊन मिरवायचं आहे मला. देवाचं कार्य करायचं आहे. कलेचं खरं चीज आहे तें तिथं—

**कुंदा** : From Classes To Masses ! फ्रॉम क्लासेस टु मासेस्–

**पांडोबा** : अगदीं बरोबर ! तेव्हढं इंग्रजी कळतं ग मला. खोट्यापासून खऱ्याकडे—दैत्यापासून देवाकडे. ज्यांना भुतावळ म्हणतो माझा मुलगा, त्या महद्भूतांच्या पायांकडे—ही तुझी कला घेऊन जा ! तिथं. त्या आमच्या जुन्या मराठमोळ तमाशांना नवी जोड दे त्या तुझ्या मलबारी कलेच्या जोरावर ! जा–आतां जा तिकडे !

**गौरी** : हो. त्या महद्भूतांच्या पायांकडेच जाणार आहें मी. तुम्हांला वाईट वाटायचं नाहीं ना बाबा ?

**पांडोबा** : कां वाईट वाटेल मला ?

**गौरी** : हें घर सोडणार मी–नवा संसार थाटणार म्हणून सांगितलं ना मी ?

**गोविंद** : कुठं ? कुठं थाटणार आहेस हा नवा संसार ?

**गौरी** : हें असलं वातावरण सोडलं पाहिजे मला—प्रकृतींत बदल झालाय माझ्या–ही हवा मानवणार नाहीं मला आतां.–बापूच्या घरीं जाणार आहें मी.

**बापू** : गौरी !

**गौरी** : बापूच्या घरीं !—या माझ्या नव्या बापूच्या घरीं ! ज्यानीं मला दृष्टी दिली,—माणसांतला देव मला दाखवला–त्या या माझ्या बापूजींच्या घरीं—दरिद्रीनारायणांच्या मेळाव्यांत आतां जाणार आहें मी. पूर्वीं तिथंच होतें मी अन् आतांही तिथंच जाणार आहें मी.

**रमेश** : ( प्रवेशून ) कुठं जाणार आहेस गौरी ?

**गौरी** : नवा संसार थाटायला. नवं घर करायला.

**रमेश** : कुठं ? माझ्याबरोबर ?

**गौरी** : हें घर सोडणार आहें मी आतां.

**रमेश** : मीही सोडणार आहें हें घर.
**गौरी** : मी कुठं जाणार आहें माहीत आहे ?
**रमेश** : कुठ ?
**गौरी** : नवा रस्ता दिसलाय मला. नवी जागा मिळालीय मला.
**रमेश** : कुठं ?
**गौरी** : ( गंभीर होऊन ) तमाशात !
**रमेश** : तमाशांत ?
**गौरी** : मघाशीं तूं मला विचारलंस—आतां उत्तर देतें मी-मी तमाशांत जाणार आहें. आतां करणार आहेस माझ्याशीं लग्न ?

**पांडोबा** : तुझ्याशीं ?
**गौरी** : हो. [ पांडोबाला ] आत्तांच त्यानं विचारलं होतं मला. [ रमेशला ] आहे कबूल ?

**रमेश** : तमाशांत ! तमाशांत ! ! अमेरिकेंत घेऊन जाणार होतों मी तुला-- इंग्लंडांत नेणार होतों. फ्रान्स, जर्मनी, इटलीलासुद्धां थक्क करून टाकलं असतंस तूं—
**गौरी** : माझी आई सोडून ? माझी भारतमाता सोडून ? माझ्या कलेची या भारताला ज्या वेळीं फार जरुरी आहे, त्यावेळीं ही मायभूमी सोडून मी परदेशीं जाऊं ? माझी आई हांक घालतेय मला तमाशांत ये म्हणून ! माझ्या आईचीं पावलं **तिथं** दिसताहेत मला.
**रमेश** : भिकारीण ती भिकारीणच ! ( आंत जातो.)
**गोविंद** : गौरी ! -- काय बोलूं मी ?
**गौरी** : कांहीं बोलूं नको. मी तुला ओळखतें. तुझं गुपित मला माहीत आहे. आतां त्यागाचं कंकण बांधलंय मी. लग्नाच्या कंकणाची कल्पना यावेळीं दुःसह होतेय मला. शेवटचा शब्द म्हणून सांगतें,-देशाच्या सेवेसाठीं माझी कला पुरेपुर राबवली-त्यागाचा संदेश द्यायचा काल हा आहे-तो संदेश शेवटपर्यंत जाऊन पोंचला अशी खात्री झाली मला—अन् तोंपर्यंत तूं वाट पाहिलीस तर लग्न करायचं तर तुझ्याशींच करीन.

**कुंदा** : मला आशीर्वाद दे गौरी—स्वार्थाचा लवलेशसुद्धां माझ्या मनाला शिवूं नये असा आशीर्वाद दे. त्यागाच्या देवते, अशिक्षित कलाकाराच्या पायाजवळ या पदवीधराचा हा पहिला प्रणाम !

**गौरी** : हें काय कुंदाताई–( तिला कवटाळते. )

**पांडोबा** : आज सार्थक झालं माझ्या जन्माचं !

**गौरी** : येतें बाबा. ( त्याच्या पायावर डोकें ठेवते. ) चला बापू–

[ पट परिवर्तन ]

गौरी आपल्या कलेचें प्रदर्शन तमाशाच्या रंगमंचावर करीत असल्याचें प्रत्यक्ष दृश्य दिसत असतांना—

— पडदा —

ॐ तत्सत्